# अनिकेत

[ टेनिसन्‌च्या ‘ इनॉक ऑर्डन्‌ ’ या काव्याचें भाषांतर ]

गिरीश

सदस्य, रविकिरणमंडळ, पुणें

मूल्य रु. २–४–०

व्हीनस प्रकाशन : पुणें

# अनुक्रमणिका



• • •

## मुद्रणशुद्धि

| ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ३१४ | विसरला | विरमला |
| ५३८ | नव | तव |
| ६०० | परंतु | परंतू |

• • •

# र वि कि र ण  मं ड ळ

डॉ. माधव त्रिंबक पटवर्धन

सौ. मनोरमाबाई रानडे

प्रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे

श्री. विठ्ठल दत्तात्रय घाटे

प्रा. दत्तात्रय लक्ष्मण गोखले

श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर

श्री. यशवंत दिनकर पेंढरकर

प्रा. शंकर केशव कानेटकर



# पूर्वस्मृति !

कारुण्यपूर्ण तुजला कथितां कहाणी,
डोळ्यांतुनी घळघळा तव जाय पाणी !
ओठावरील तव लोपुन गोड हासें,
गालीं, सरोजिनि ! तुझ्या झरले उसासे ! १

ही सांगतां तुज कथा, रमुनी स्वभावें—
डोळ्यांतुनी जळ, शकू ! तव तें वहावें !
पाहूनि होय किति मी स्वमनांत चूर !
व्याकूळलों तळमळून झरून पूर ! २

झंकार दे मधुर तार तुझ्या हृदींची,
वीणा ! भिजून थिजल्या तव गानवीची !
मी सांगतां तुज कथा विवरून अर्थ,
नेत्रें तुझीं झिरपलीं सहभावनार्त ! ३

तेजें तुझ्या विलसलीं हसऱ्या कपोलीं,
झालीं, प्रभा ! करुण काहणिनेच ओलीं !
आले उसासुन किती हृदयामधूनी !
निःश्वास ते पडति कर्णपथीं अजूनी ! ४

अन् आंसवें करुण ओहळलीं किती तीं,
हे शिष्यवृंद ! तुमचीं विसरूं कशीं तीं !
निःश्वास, अश्रु धरुनी मम अंजलींत,
माझे तयांत मिळवून, बसें लिहीत ! ५

झंकार हे मधुर वा करुणार्त आसूं,
वा भग्नरम्य सुमनांतिल घोर हासूं,—
ठावें मला न ! अपुले हळुवार भाव—
मीं गुंफिले—वितरिं ' जीवन ! ' त्यास नांव ! ६

१ जुलै १९५४
पुणें ४

गिरीश

# सं स्का र

" परवाङ्मयांतील आदर्शभूत कृतींचें शुद्ध भाषान्तरच व्हायला हवें."

**माधव जूलियन** ( द्राक्षकन्या

'अ नि के त' हें एक छोटेसें भाषांतरित खंडकाव्य आहे. इंग्लंडचा राजकवि लॉर्ड टेनिसन् याच्या 'इनॉक् ऑर्डन्' या काव्याचें हें निव्वळ भाषांतर आहे. गेल्या शतकांत इंग्लंडमध्ये जे थोर व नामवंत कवि होऊन गेले, त्यांमधे टेनिसन्चें (इ. स. १८०९–१८९२) स्थान फार वरचें आहे. त्याचें शिक्षण केंब्रिजला झालें व जेव्हा त्याने आपला पहिला काव्यसंग्रह (इ. स. १८३२) प्रसिद्ध केला, त्या वेळीं त्याच्यावर लोकांनी टीकेचा गहजब केला. परंतु पुढे त्याचे एकामागून एक काव्यसंग्रह व छोटीं मोठीं काव्यें प्रसिद्ध झालीं व मग त्याची कीर्ति स्थिर झाली. 'प्रिन्सेस', 'इन् मेमोरियम्', 'डोरा' या काव्यांनी लोकांचीं मनें आकर्षून घेतलीं व 'इनॉक ऑर्डन्' या काव्याने (इ. स. १८६४) तर त्याला फारच मोठी कीर्ति व लोकप्रियता मिळवून दिली. कथात्मक काव्यें लिहण्यामध्ये टेनिसन् हा अत्यंत निष्णात होता आणि म्हणूनच त्याचीं सर्व 'आयडियल्स' हीं लोकप्रिय झालीं. त्यांत 'इनॉक ऑर्डन्'चें स्थान श्रेष्ठ असून, आपल्या शाळा कॉलेजांतून गेलीं पन्नास-पाऊणशें वर्षें त्याचा अभ्यास मोठ्या साक्षेपाने केला जात आहे.

टेनिसन् हा तत्त्वज्ञान व काव्य या दृष्टीने गेल्या शतकाचा प्रतिनिधि समजला जातो. या शतकांतले बरेचसे आचार-विचार, तत्त्वज्ञान व धार्मिक समजुती त्याच्या काव्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. टेनिसन् हा मोठा रेखीव, कांटेकोरपणाने लिहणारा कवि होता. त्याने आपल्या कथात्मक काव्यामध्ये जें जें रेखाटलें, त्यामधे तो प्रत्यक्ष जीवनापासून दूर कधीच गेला नाही. त्यामुळे

त्याचीं काव्यें सजीव व वास्तवसृष्टीचीं निदर्शक अशीं झालीं. कथागुंफण आणि कथेंतील मानसशास्त्र हे दोन त्याचे विशेष होते. मानवी जीवनांचीं त्याने काढलेलीं चित्रें जिवंत असून तीं आपल्याला जणु कांही आपल्याच जीवनाचा एखादा भाग आहेत अशीं वाटणारीं आहेत. त्यामुळे 'राजकवि' होऊनहि त्याला 'लोककवी'ची पदवी प्राप्त झाली.

तसें पाहिलें तर 'अ नि के त' ही एका खलाशाच्या जीवनाची अगदी साधीसुधी कथा आहे. कथानक असें तिला फार थोडें आहे. परंतु तें रंगवितांना टेनिसन् हा मानवी मन, परिस्थिति, व मनुष्याच्या अंतःप्रेरणा यांच्या सखोल व्यापारांत इतका आंत शिरला आहे, की त्यांच्या कणाकणाचे तो आपल्या कौशल्याने वर्णन व विश्लेषण करूं लागला, की आपण आपलें भान विसरतों, तन्मयतेने त्याच्या मागे जातों, ते ते बारीकसारीक भाग हे त्या कथानकाचाच एक महत्त्वाचा भाग होऊन बसतात व आपण त्यात पूर्ण रंगून जातों.

**कथावस्तु :**

टेनिसन्ने निवडलेली कथावस्तूच आधी अप्रतिम आहे. तिच्यामध्ये मानवी जीवन शंभर टक्के भरलें आहे; आणि अशी कथा टेनिसन्सारख्या नाणावलेल्या व श्रेष्ठ कलावंत म्हणून गाजलेल्या कवीने हाताळली आहे. त्यामुळे 'इनॉक् ऑर्डन्' सारखें निर्दोष, कलात्मक व हृदयस्पर्शी काव्य क्वचितच आढळेल. इनॉक, ॲनी व फिलिप् हीं एका बंदरी व डोंगरी खेड्यांतील तीन मुलें. यांच्या जीवनांत विशेष असें काय असणार? लहानपणीं तीं एकत्र खेळलीं, इनॉकचें व फिलिपचें हळूहळू ॲनविर प्रेम बसलें, इनॉकने ॲनीशीं लग्न केलें, संसार केला, पण तो सातच वर्षें; आणि मुला-बाळांचें बरें व्हावें यासाठी पैसा मिळविण्यास तो दूरदेशीं गेला. दुर्दैवाने त्याची नौका बुडाली व तो एका बेटावर फेकला गेला! इकडे ॲनीने तेरा वर्षें वाट पाहिली, ती कंटाळली; अनेक आपत्तींना तिने तोंड दिलें व शेवटीं नाइलाज म्हणून तिने फिलिपशीं लग्न केलें. आणि जरा कुठे त्यांत रमते, तों योगायोगाने इनॉक परतला! ॲनीच्या सुखासाठी धडपडणाऱ्या इनॉकने तिची सर्व कथा ऐकली, संयम केला, तिच्या सुखाचें दृश्य पाहिलें, आपल्या उफळणाऱ्या भावना

आवरल्या व त्याच बंदरांत अज्ञातपणें आपली जीवनयात्रा आवरली ! इतकी साधी आणि सरळ ही कथावस्तु आहे. पण तिची गुंफण करतांना टेनिसन्‌ने तिचा कणन् कण, धागान् धागा इतका बारीक पिंजला आहे कीं त्यांत आपल्याला एका महान् जीवनाचें दर्शन घडतें. मानवी जीवनांत येणारे साधेसुधे प्रसंग, पेच, अडचणी, योगायोग, आपत्ती, दुर्दैवें आणि या प्रत्येक बाबतींत प्रत्येक व्यक्तीचीं झालेलीं मानसिक द्वंद्वें, काय करावें, काय नाही, हें बरें आहे का, तें बरें दिसेल का, अमुक हें योग्य कीं अयोग्य, यांचे चाललेले झगडे पाहिले, कीं आपण आपल्या भोवतालचें कुठलें तरी एकादें खरेंखुरें जीवन पहात आहों असें आपणांस वाटतें. तीं तीं दृश्यें आपल्या हृदयाचा ठाव घेतात व क्षणाक्षणाला आपलें मन अस्वस्थ करून सोडतात. इनॉक, ॲनी आणि फिलिप यांच्या जीवनांतील बारीकसारीक गोष्टींशींहि टेनिसन् समरस झाला आहे, त्याने ते वेचले आहेत व आपल्या पाणिस्पर्शाने त्यांत विलक्षण जादू भरून ते योग्य ठिकाणीं ठेवले आहेत. त्यामुळे प्रत्येक गोष्ट कशी सुंदर, निर्मळ व पारदर्शक होत गेली आहे कथावस्तु जरी सांपडली, तरी तिला कलात्मक असें श्रेष्ठ स्वरूप देणें हें शेवटीं कवीच्या कौशल्यावरच अवलंबून असतें, आणि तें कौशल्य वापरतांना विविध भावनांचा खेळ, मनांतील झगडे व जीवनाविषयींची धडपड साधावयाची म्हणजे तें साक्षात् जीवनाशींच झगडा करण्यासारखें आहे. लेखक हें प्रामाणिकपणाने करूं लागला की साहजिकच त्याला त्या त्या प्रेरणा होतात, योग्य त्या रसाचा उठाव होतो व त्याच्या लेखनाला रंगत येते. टेनिसन्‌चें असेंच झालें आहे. ही कथा रंग-वितांना अष्ट सात्त्विक भाव त्याच्यापुढे हात जोडून उभे राहिले आहेत व त्याला–'आम्ही सर्व आपल्या सेवेला हजर आहों, हवा तो भावरंग घ्या !' असें जणुं कांही म्हणताहेतसें वाटतें. टेनिसन्‌च्या विशाल प्रतिभेने आपले पंख विस्तृत पसरले आहेत व सर्व कथावस्तु आपल्या पंखाखाली घेऊन ती भराऱ्या मारीत चालली आहे असा भास होतो. पुष्कळ वेळा एखाद्या कथेचें पिंजण सुरू झालें की कथा पातळ व पाल्हाळिक होऊं लागते, हा आपला नेहमीचा अनुभव आहे. पण टेनिसन्‌चें उलट झालें आहे. त्याने ही कथा चित्रित करतांना आपला तोल आणि संयम इतक्या कांटेकोरपणाने राखला आहे, की हातीं आलेला प्रत्येक कण सुंदर कसा होईल, कलात्मक

कसा होईल, योग्य ठिकाणीं चपखल कसा बसेल व आपली जागा सजवून पुन्हा तो कथेच्या सर्वसाधारण रचनेंत शोभून कसा दिसेल याची काळजी वाहिली आहे; इतकेंच नव्हे तर त्याबद्दल त्याने कमालीची दक्षताहि बाळगली आहे. त्याने वापरलेल्या कुंचलीचीं टोकें इतकीं सूक्ष्म आहेत व रंग इतके नाजुक व मोहक आहेत की कधी कधी तो कागदाच्या अगदी जवळ हळुवारपणें नुसती हवेंतच कुंचली फिरवीत होता व खाली रंग वठत होते असें वाटतें. पात्रांच्या मनाचे झगडे चालू झाले की त्याच्या प्रतिभेला विशेष जाग येते आणि मग टेनिसन् आपल्या पात्रांच्या अंतरंगांत जाऊन तिथून बोलत आहे व आपल्या हृदयाच्या तारा छेडीत आहे असें वाटतें. हें काव्य वाचतांना वाचकांना याचें प्रत्यंतर येईल. मूळ कथावस्तु व तीवर टेनिसन्‌ने केलेली कलात्मक रचना वा संस्कार यांचें स्वरूप हें असें आहे.

ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने टेनिसन्‌च्या कवितांचा एक संग्रह १९२३ मध्ये ' ' Poems of Tennyson ' या नांवाने प्रसिद्ध केला. त्याच्या प्रस्तावनेंत ऑक्स्फर्डच्या ' मॅगडेलन ' कॉलेजचे प्रेसिडेंट व टेनिसनचे मित्र सर हर्बट वॉरन हे म्हणतातः— ..." Art, too, alike the Drama, Music, and Painting, from the first spoke to his ear and eye......He has something, and something of the best for everyone......He pointed out to me that although he wrote ' Robin and Richard ', he did not write ' Richard and Robin ', because it failed to satisfy his ear. "

" What is he to us today ? In this Oxford volume I quote Oxford's chancellor : ' He is at least these things, a great artist, a great singer, a great prophet, a great patriot, and a great Englishman. ' "

या उताऱ्यावरून टेनिसन्‌च्या योग्यतेसंबंधी बरोबर कल्पना येईल.

**संस्कार :**

काव्याने मनावर संस्कार होतात हें सर्वांच्या परिचयाचें आहे. पण हे संस्कार बालपणांत किंवा शालेय वातावरणांत झाल्यास ते दृढ आणि टिकाऊ होतात. काव्यानंदाचा आस्वाद घेतांना हे संस्कार न कळत होतात व ते तसेच झाले पाहिजेत. त्याचप्रमाणे जीवनदर्शन घडून आनंद झाला पाहिजे. आपण कांहीतरी आदर्श पाहिलें, आपल्याला जीवनाचा कांहीतरी प्रत्यय आला, खरेंखुरें असें आपण अनुभवलें, असें वाटलें की त्यांतून होणारा आनंद अद्वितीय असतो. खऱ्या काव्यांत जीवन व साहित्य हीं एकजीव झालेलीं असतात. केवळ थोर कवीचीच प्रतिभा त्यांचें समरसतेने चित्रण करूं शकते. आणि हें पहात असतांना जीवनाचा पुनःप्रत्यय येतो, त्यांतून आनंद होतो व त्याचे संस्कारहि मनावर दृढ होतात. अशा प्रकारचे उच्च संस्कार करणारे कांही आदर्श या काव्यामध्ये आहेत. ध्येयवाद व व्यवहारवाद यांची संगत जमूं शकत नाही, असें कांही लोक बोलतांना आपण ऐकतों. पण त्यांच्या शक्यतेचे प्रात्यक्षिक आपणांस साक्षात् इनॉकच्या स्वरूपांत या काव्यांत दृष्टीस पडतें. ॲनीवर नितान्त प्रेम करणारा पण त्याबरोबरच आपली जबाबदारी ओळखून तिच्यासाठी स्वसामर्थ्याने प्रथम पैसा कमावून व समर्थ असा खलाशी होऊन घर बांधणारा, मुलांवर गाढें प्रेम करणारा, पण त्यांच्या जीवनाची आपल्या जीवनासारखी परवड होऊं नये, म्हणून रात्रंदिवस काळजी वाहणारा, तारुण्यांतील गुलाबी प्रेमाच्या वातावरणांत गुंगणारा, पण क्षणोक्षणीं मनाला व सढळ हाताला लगाम घालणारा इनॉक पाहिला की ध्येयवाद व व्यवहारवाद यांचें सुंदर मिश्रण कसें असतें तें प्रत्ययास येतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल की त्याच्या व्यवहारवादांतहि एकप्रकारचा ध्येयवाद आहे. आपल्या पत्नीला चांगलें जीवन व्यतीत करतां यावें, आपल्या मुलांना उच्च शिक्षण मिळावें, आपलें जीवन आदर्श व्हावें असें म्हणणारे ध्येयवादी पुष्कळ असतात; पण त्यांचा तो ध्येयवाद कृतिशून्य व म्हणूनच पोकळ असतो. तो कृतींत आणण्याच्या शक्याशक्यतेची बाजू ते पाहत नाहीत किंवा त्यांना ती पाहतां येत नाही. त्यामुळे तो ध्येयवाद अर्थशून्य होतो. इनॉक हा तसा नाही. उच्च ध्येय व त्यावर भराऱ्या मारणारें मन, त्याला लाभलें होतें; पण त्याच्या मनाइतकेंच

त्याचे हात खंबीर होते. मनांत आलेलीं स्वप्नें साकार करण्याचें सामर्थ्य आणि कौशल्य त्याच्यामध्ये होतें. त्यामुळे तो आपलें साध्य अल्पावधींत हस्तगत करून जीवनांतील परमसुखाचीं अशीं सात वर्षें घालवूं शकला. पण इतकेंहि करून पुनः दैव म्हणून कांही आहेच दुर्दैवावर मात करण्यासाठी तो कमालीचा झगडला ! त्याला यश आलें नाही, पण तरी तो झगडावयाचा राहिला नाही. काव्याच्या प्रथमार्धांत तो भोवतालच्या परिस्थितीशीं झगडला आहे, व उत्तरार्धांत तो आपल्या स्वतांशींच झगडला आहे; पण आत्मिकदृष्टया त्याचा विजय झाला आहे. आणि आपल्या ध्येयदृष्टीने 'ॲनीला सुखांत ठेवावयाची व मुलांचें कल्याण करावयाचें' हें त्याचें ब्रीद, जेव्हां तो स्वतांशींच झगडतो व ॲनीवरच्या आपल्या खऱ्याखुऱ्या प्रेमाची साक्ष पटवतो, त्या वेळीं आपणांस दिसून येऊन आपण स्तिमित होतों त्याच्या व्यक्तिमत्त्वांतील विशालता, गाढेपणा, प्रामाणिकपणा, श्रद्धा, धैर्य, चिकाटी व संयम वगैरे अनेक गुणांचा आपणांस प्रत्यय येतो त्याची अलौकिकता आपणांस पटते, त्याच्यापुढे आपलें मस्तक नम्र होतें ! 'प्रीति दोनदा करतां येते ?' हा प्रश्न करणारी ॲनी व त्याचें आपल्या जीवनाच्या प्रात्यक्षिकाने म्हणजेच सोसलेल्या दुःखभाराने उत्तर देणारा इनॉक यांचीं चित्रें आपलें मन भारून टाकतात. इनॉकचा संयम पाहून आपला संयम सुटण्याची वेळ येते; ॲनीची धडपड पाहून आपलें मन हळवें होतें, आणि परिस्थितीपुढे संयम असूनहि मान कशी वाकवावी लागते याचें चित्र दिसतें; त्याबरोबरच कशीहि परिस्थिति आली तरी अभेद्य खडकाप्रमाणे खंबीरपणें ताठ उभा राहणारा इनॉक पाहिला, की जीवन किती कठिण आहे व प्रसंगीं परिस्थितीवर मात करणारें आहे, याची साक्ष पटते. इनॉक, ॲनी व फिलिप यांच्या जीवनाचें दर्शन घेत असतांना हा जो अनुपमेय आनंद होतो, त्यांतूनच असले अनेक संस्कार मनावर कायमचे ठसे उमटवितात.

या काव्याच्या कथानकांतील तीन पात्रांच्या तीन परी झाल्या आहेत. ॲनीला कमालीची धडपड करूनहि शेवटीं परिस्थितीला बळी पडावें लागलें, तर फिलिप हा परिस्थितीशीं तडजोड करीत राहिला, आणि इनॉकवर परिस्थितीने मात केली असली तरी त्याने शेवटपर्यंत आपला संयम सोडला

नाही व आंतरिक दृष्ट्या तो नमला नाही. या तीन चित्रांचे आपल्या मनावर तीन निरनिराळे परिणाम होतात; पण सर्वांबद्दलच आपणांस कमालीची सहानुभूति वाटते. मग हें काव्य वाचल्यावर मनांत आणखी एक प्रश्न उभा राहतो, तो हा की, इनॉक, ॲनी व फिलिप यांपैकी खरोखरी कोणाचें काय चुकलें ? आणि याचें उत्तर, विचार करून शेवटीं 'कोणाचेंहि कांहीहि चुकलें नाही.' असें द्यावें लागतें ! प्रत्येक पात्राच्या मनाची उंची कमी-जास्त असेल, पण अनुकूल वा प्रतिकूल परिस्थितींत तीं तीं पात्रें आपल्या स्वभावधर्माप्रमाणे अगदी बरोबर वागलीं व असेंच जगांत होत असतें याचा पडताळा काव्यांत येतो. या सर्व गोष्टींवरून टेनिसन्‌चें स्वभावरेखाटन व त्याने ओळखलेलें पात्रांचें मानसशास्त्र अगदी बरोबर आहे असा निर्णय द्यावा लागतो. साध्यासुध्या जीवनाचें सुंदर चित्र रेखाटून, त्यांतील कला निर्दोष करावयाची व त्यांत महान् आदर्शाचें दर्शन घडवावयाचें ही कला अनन्यसाधारण आहे. टेनिसन्‌ने हें केलेलें आहे व त्याबद्दल त्याला धन्यवाद द्यावेसे वाटतात.

जीवनांत सुखदुःखें भरलेलीं आहेत व असतात; आणि माणसाला सुखाचा आस्वाद घ्यावयाचा असतो, दुःखाशीं झगडावयाचें असतें. दुःखाशीं झगडतांना त्यांच्या आहारीं जाऊन झगडणें व त्यांशी कणखरपणाने झगडणें यांत फरक आहे. हें सामर्थ्य आपल्या अंगीं बाणण्यासाठी आपल्यावर अनेकांचे तसे दृढ संस्कार व्हावयास पाहिजे असतात. हे संस्कार करणाऱ्यांत आई-बाप, गुरु, मित्र, थोर पुरुष व ग्रंथ यांचा भाग विशेष असतो. त्यांत अशा काव्यांचा संस्कारी भाग हुकमी ठरतो. काव्यांतून बोध मिळावा की नाही या वादांत मी पडत नाही व मला तें म्हणावयाचेंहि नाही. पण लहानपणीं पढलेलें सुंदर काव्य मनावर दृढ संस्कार करतें व आपलें व्यक्तिमत्त्व बनविण्यास तें मदत करतें, खास. अशा उत्तम संस्कार करणाऱ्या काव्यांपैकी हें एक आहे.

हें काव्य मी इंग्रजी हायस्कूलमध्ये शिकत असतांना प्रथम वाचलें; पुढे महाविद्यालयांत गेल्यावरहि त्याचा अभ्यास करावा लागला. त्यानंतरच्या शालेय नोकरींत असतांना विद्यार्थ्यांना तें अनेक वेळां शिकविण्याचा प्रसंग आला. कांही खाजगीरीतीने विद्यार्थिनींना, मुली-सुनांना तें शिकवावें लागलें.

त्यामुळे माझ्या मनावर त्याचीं एकसारखीं पुटें बसत गेलीं; आणि प्रत्येक वेळीं वाचतांना त्यांतील सौंदर्य अवीट, ताजें व संस्कारी आहे याचा पुनः पुन्हा प्रत्यय आला. माझ्या विद्यार्थ्यांच्या मनावर झालेले परिणाम मीं साक्षात् पाहिले होते. या सर्वांचा एकवटून माझ्यावर परिणाम झाला. १९४२ सालीं हें काव्य माझ्या मुलीला व सुनेला मीं शिकविलें, तेव्हा मला त्याचें भाषांतर करावें असें उत्कटतेने वाटूं लागलें. परक्या भाषेंतील सुंदर कलाकृति आपल्या भाषेंत असाव्यात या कल्पनेने उचल खाल्ली व मी भाषांतर करूं लागलों. लवकरच तें पुरेंहि झालें. पुढे त्याची साफसफाई सुरू झाली. ती परवापरवापर्यंत चालू होतीच. दरम्यानच्या काळांत त्याचीं जाहीर अशीं दोन-तीन वाचनेंहि झालीं. हीं वाचनें करण्यांत माझा एक स्वार्थी हेतु होता. मूळ काव्याचें केलेलें भाषांतर बरोबर झालें की नाही, तें परिणामकारक होतें कीं नाही याचा अदमास घेण्याचा तो एक मार्ग होता; आणि तिन्ही ठिकाणीं म्हणजे कविवर्य साधुदास किंवा मित्रवर्य ना. धों. ताम्हनकर यांच्या समवेत सांगलीस, रसिकमित्र खंडोपंत कुलकर्णी यांच्या घरीं सातान्यास, व प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली फर्ग्युसन कॉलेजमधील ' साहित्य-सहकार ' मंडळांत पुण्यास, मला फार छान अनुभव आले. हे सर्व प्रसंग माझ्या तरी जीवनांत मी चिरस्मरणीय मानीन. प्रा. रा. श्री. जोग यांनी काव्य व वाचन परिणामकारक झाल्याचा निर्वाळा दिला व मग मी हें प्रसिद्ध करण्याच्या विचाराकडे वळलों.

' आपलें भाषांतर शक्य तितकें चोखंदळपणाने केलेलें असावें ' हा इशारा माझे कविमित्र यशवन्त यांनी वेळींच दिला व गेलीं तीन चार वर्षें मी त्या दृष्टीने त्याकडे पाहून, मधून मधून त्यावर पुन्हा हात फिरवूं लागलों. मला त्यांत कांही ठिकाणीं दोष व अपुरेपणा दिसला. शक्य तितके ते काढून टाकण्याचा मी प्रयत्न केला आहे; परंतु भाषांतराचें काम संपूर्ण निर्दोष झालें आहे, असें समाधान मनाला कधीच वाटत नाही, असें वाटतें.

कारण भाषांतराचें कामच हें असें आहे. तें अत्यंत अवघड आहे. तें संपूर्णपणें उत्कृष्ट व समर्पक करणें ही गोष्ट एखादें स्वतंत्र काव्य लिहिण्यापेक्षाहि अवघड आहे. त्यांतहि दोन भिन्न भाषांच्यामागे असलेली संस्कृति व त्यांची प्रकृति पाहिली म्हणजे हें काम अतिशय अवघड आहे याची

अधिकच जाणीव होते. इंग्रजी समाजाच्या चालीरीति वेगळया, त्यांचा धर्म वेगळा, त्यांच्या भाषेची प्रकृति वेगळी, आपल्या भाषेची प्रकृति व आपली संस्कृति वेगळी. अशा वेळीं रूपांतराचा विचार करणें भाषांतराच्या विचारापेक्षाहि अधिक धोक्याचा आहे असें वाटतें. कारण रूपांतरांत आपण मुळांतील सर्व प्रसंग, कल्पना, घटना किंवा संस्कार जसेच्या तसे दुसऱ्या भाषेंत आणूं शकत नाही. ' ॲनीने दोनदा लग्न केलें ( शंभर वर्षांपूर्वी ), समुद्रांत पाणधुकें पसरलें, मुलाचें दफन केलें, इंग्लंडमधील खेड्यांत उदास हवा पडली, रॉबिन बेसूर ओरडला, वैभवशाली थडगें बांधलें', अशा एक ना दोन शेंकडों गोष्टी मराठी संस्कारांत संक्रमित कशा करणार ? काव्यांत प्रसंग घटना, स्वभावविशेष व विशेषतः **वातावरण** या गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. शंभर-दीडशें वर्षांपूर्वीची गोष्ट म्हटली की आपल्याकडील जुन्यांतलें जुनें वातावरण. मग इंग्रजी वातावरणांतील घटना त्यांत कशा दाखविणार ? पदोपदीं अडचण येणारच. म्हणून रूपांतरापेक्षा भाषांतराचा मार्ग अधिक अवघड असला तरी तोच श्रेयस्कर असें मला वाटलें. इनॉक ऑर्डन्चें निव्वळ भाषांतर या दृष्टीने मराठीं काव्यांत हेंच पहिलें भाषांतर असावें.

भाषांतरित व रूपांतरित खंडकाव्यांची मराठीची परंपरा फार मोठी आहे. ती किती मोठी आहे, हें दाखविण्यासाठी या पुस्तकाच्या शेवटीं एक परिशिष्ट जोडलें आहे तें पाहावें. त्यावरून मराठींत संस्कृत, इंग्रजी, मागधी, हिंदी, बंगाली वगैरे अनेक भाषांतून भाषांतरकारांनी व रूपांतरकारांनी निरनिराळे प्रवाह कसे आणून सोडले आहेत तें दिसेल. अनेकांनी अनेक प्रयत्न केलेले पाहिले, तेव्हा मला धीर आला. त्यांतच प्रत्यक्ष ' इनॉक ऑर्डन् '-च्या आधारें मराठींत ' **सदू कोळी** ' ( ग. र. नवलकर ), ' **सारजा** ' ( ए. पां. रेंदाळकर ) व ' **जीवनाधार** ' ( गो. न. नातू ऊर्फ कवि मनमोहन ) यांच्या कलाकृती अवतरल्या आहेत. याखेरीज प्रा. श्री. म. माटे व कै. साने गुरुजी यांच्या गद्य कलाकृतीहि वाचकांसमोर आल्या आहेत. हें सर्व पाहिल्यावरच मला विश्वास वाटला व निव्वळ भाषांतराला हात घालण्याचें मीं धाडस केलें. तीन-चार स्वतंत्र खंडकाव्यें लिहिल्यावर असा एखादा भाषांतराचा प्रयत्न केल्यास, रसिकवाचक मला क्षमा करतील अशी आशा आहे.

भाषांतरासाठी मी ' साकी ' ही जाति वापरली आहे. कथाकथनाला हें वृत्त फार समर्पक आहे. तें तोटकें पडत नाही किंवा लांबटहि वाटत नाही. टेनिसन्ने निर्यमक ओळी लिहिल्या असतांना, मी सयमक लिहिल्या, याचें नम्र समर्थन एवढेंच आहे, की सयमकता ही मराठीची प्रकृति आहे. एखाद्या प्रदीर्घ काव्यामध्ये तर तिची जरूरी पोषकच ठरते. तसेंच टेनिसनने मूळ काव्यांत जो व जेवढा आशय ठेवला आहे, त्याबाहेर मी गेलों नाही. त्याचा आशय पूर्ण व्यक्त करण्यासाठी मुळापेक्षा अधिक शब्दांची वा ओळींची जरूरी वाटली तेथे मी त्यांचा सढळपणें उपयोग केला आहे. पदरची मात्र एकहि कल्पना त्यांत घुसडली नाही.

या काव्याच्या भाषांतराला मला माझ्या विद्यार्थ्यांनीच प्रेरणा दिली. माझ्या मनांत या काव्याचा अंकुर गेलीं दोन तपें त्यांनीच रुजवत ठेवला. आणि आज प्रकाशनासाठीहि माझे विद्यार्थीच श्री. स. कृ. पाध्ये व अ. ह. लिमये हे पुढे येत आहेत. शिक्षकाला यापरतें समाधान कोणतें ? आणि त्यांच्या ऋणांतून सुटावें असें मला तरी कां वाटेल ? आज साठी उलटल्या· नंतर शिक्षणक्षेत्रांतुन सेवानिवृत्त होतांना, त्यांच्याविषयींच्या प्रेममय स्मृतींचा साठा हृदयाशीं बाळगून व ही माझी कृति त्यांना वाहून मी बाहेर पडत आहें. हें माझें थोर भाग्य आहे व हें माझें चिरकाल टिकणारें समाधान आहे !

इनॉक ऑर्डन्चें भाषांतर करतांना व रसग्रहण आणि परिशिष्ट तयार करतांना मला अनेक लहानथोरांचें व ग्रंथांचें साहाय्य झालें आहे. ऑक्स्फोर्ड युनिव्हर्सिटी प्रेसचा १९२३ चा ' टेनिसन्चा कवितासंग्रह ', गुरु. प्रा. रा. कृ. लागू यांची ' इनॉक ऑर्डन् 'ची सटीप प्रत व श्री. शं. ग. दाते यांची ' मराठी ग्रंथसूचि ' यांची मला फार मदत झाली. प्रा. रा. श्री. जोग, गं. बा. सरदार यांचीहि परिशिष्टाच्या बाबतींत मदत झाली; मुद्रणप्रतीचा कांही भाग माझी सून चि. सौ. मीना हिने तयार केला. या सर्वांचा मी ऋणी आहें.

२२ सप्टेंबर १९५४
' सुषमा ', पुणें ४

गिरीश

# अ नि के त

लांबट रांगा तुटुन कड्यांच्या, खिंड मधेच जहाली,
पिवळी वाळू आणि समुद्री फेसांनी ती भरली.
पुढती तांबुस कौलारें हीं निरुंद गोदीभवती,
पुंज घरांचा आणि पुढे हें पडकें मंदिर वरती;
लांब खालुनी वळणें घेउन त्यावर रस्ता जाई,
उंच चिमणिच्या थेट पिठाच्या गिरणीजवळी पाहीं.
अस्मानीं त्यावरती पसरे भुरें सड्याचें रान,
डॅनिश थडगीं, हेझलराई यांनी भरलें स्थान.
हिरव्या पेल्यामधें तरारे फळझाडांचा झोक,
वेचाया तीं वर्षाकांठीं जमती हौशी लोक !

याच किनाऱ्यावरती पूर्वीं एका शतकामागे,
तीन घरांतिल तीन बालकें वावरलीं अनुरागें.
बंदरांतली गोड किशोरी ॲनी ‘ ली ’–कुलजन्मा,
गिरणीवाला पुत्र एकला फिलीप ‘ रे ’—कुलनामा,
इनॉक ऑर्डन् आणि गावठी एक खलाशी पोर,
होय पोरका, फुटतां नौका हिमखडकीं जो घोर;
खेळ किनाऱ्यावरी खेळतीं नित्य तीन हीं बाळें,
जुन्या मोडक्या अडगळवस्तूसंगें करिती चाळे.
टेकाडें किति वायफळांचीं जागोजागीं काळीं,
दोरखंड नौकांचे अवजड, अन् माशांचीं जाळीं,
नांगरटोकें गंजुन गेलीं, विसावलेल्या होड्या,
त्यांमधि बांधुन किल्ले वाळुंत, करती गमती, खोड्या.

भरतीने ते विरघळतांना नीट न्यहाळत बसतीं,
अनुसरुनी वा फेसळलेल्या लाटामागे पळतीं.
खेळुनि ओल्या वाळूवर ते हरदिन उठविति पाय,
आणि चिमुकली पदावली ती धुवुन जळाने जाय !

अरुंद होती जरा पोकळी तिथेच खडकाखाली,
' घर घर ' खेळुन रमलीं बाळें त्यांतच सांजसकाळीं.
इनॉक होई केव्हा मालक, फिलीप दुसऱ्या दिवशीं,
ॲनीला पण व्हावें लागे मालकीण दोघांशीं.
कधी कधी पण आठवडाभर इनॉक मालक राही,
आणि वदे तो—" माझं घर हें, मालकीण माझी ही ! "
" अन् माझी ही अळिपाळीनं ! "—फिलिप बोलुनी जाई,
कलह लागतां इनॉक त्याचें चालुं न देई कांही.
बलशाली तो मालक होतां फिलीप ये रागाला,
निळसर दुबळे नेत्र लागती त्याचे वाहायाला.
" धिक्कार तुला इनॉक ! "—ऐसें फिलिप गर्जुनी बोले;
वदे चिमुकली मालकीण तों डोळे होउनि ओले—
" भांडुं नका हें असं ! विनवितें मैत्रिण मी दोघांस,
थोडी थोडी मी दोघांची बाइल होइन खास ! "

परि बाल्याचीं आरुण किरणें झणी उलगलीं पुरतीं,
तारुण्याच्या नव सूर्याची कमान झाली चढती.
आणि उदेलें कोमल आंतर नव भावांचें ऊन,
दोघांचें ही मन तों बसलें ॲनीवराति खिळून.

इनॉक अपुली बोलुनि दावी प्रीति अंतरांतील,
प्रीती करुनी, फिलीपचा पण, मुग्ध राहिला दील.
आणि पोर ती ?—तिला कळवळा फिलीपचा ये फार,
परंतु होतें इनॉकवरती प्रेम तिचें अनिवार !
माहित नव्हतें तिचें तिलाही हे हृदयाचे भाव,
विचारल्यावर नाकारुन, ती लागुं न देई ठाव.
इनॉकने पण दृष्टीपुढती धरिलें आता ध्येय—
‘ परिसीमेने गाठायाचें प्रथम सुवर्णश्रेय;
निजसत्तेची नौका घेउन, तीवर मिळवुन दाम,
ॲनीसाठी तिथेच सुंदर बांधायाचें धाम ! ’
यापरि ठरवुन पुढे चालतां, उत्कर्षाचीं वर्षें—
अशींच आलीं की न तयाविण चमके कुणी प्रकर्षें;
सुदैवशाली धीर मनाचा ठरे खलाशी तोच,
पंचक्रोशित कुणा संकटीं नव्हता इतुका पोच.
आणि वर्षभर त्यांतच होउन नौकेवर व्यापारी,
चालविली ती, आणि जाहला समर्थ तो अधिकारी.
सुकतीचें जळ ओढुनि नेतां कोणा, येउनि कीव—
तीन वेळ तो धाडस करुनी वांचवि बुडते जीव !
आणि तयावर मर्जी बसली ज्याची त्याची फार,
एकविसाव्या वसंतकालीं ये दैवास बहार !
नाव खरीदुन, घरट्यापरि घर सुंदर केलें त्याने,
ॲनीसाठी अर्धपथावर गिरणीच्या रस्त्याने !

अशी एकदा सुवर्णसंधी विलसे वर्षाकालीं,
युवयुवतिजनें मजा सुटीची करावयास निघालीं.

लहानथोरें पिशव्या, पोर्ती आणि करंड्या गोल,
घेउन संगें फळार्थ गेलीं, राईमाजिं विलोल.
( वडिल अजारी—जवळ हवें कुणि—फिलिप राहिला मागे. )
तासभराने हळुहळु डोंगर चढावया मग लागे.
तों, राईची उतरण पसरी जेथे झुडुपी पांख,
खिंड कड्याने तेथिल, त्याचे पूर्ण वेधिले आंख.
बसलीं होतीं इनॉक—ॲनी खेटुन, हातीं हात,
टपोर त्याचीं करडीं नयनें भरलीं तेजें शांत !
आणि चेहरा वादळलेला, मांसल तांबुस गाल,
वेदींतिल जणुं पवित्र जळता प्रशान्त अग्नी लाल.
दृश्य बघुन तें फिलिप अंतरीं लिखित आपुलें उमजे,
नयनीं त्यांच्या, भवितव्याची ठोकर अपुली समजे !
आणि चुंबनासाठी आले ओठ तयांचे जवळी,
तेव्हा तर, तो किंचाळूनी घसरुन पडला खाली !
रानीं श्वापद लोळे भूवर लागून वर्मी बाण,
कोलमडूनी राइंत, त्यापरि व्याकुळ झाले प्राण !
होते सगळे आपआपुल्या मौजेमाजीं दंग,
फिलिपजीवनांतिल हा दिसला न कुणा परि बेरंग !
आणि बिचारा उठुन, घराला हळुहळु परतुन गेला,
प्रीतीसाठी राहुन हृदयीं जन्माचाच भुकेला !

आणि पुढे शुभमंगल झालें, घणघण घंटा बोले,
भरभर गेला काळ, सुखाचीं सात लोटलीं सालें !
मधुर निरामय समृद्धीचीं वर्षें सात सुखाचीं,
परस्परांच्या प्रेमभराचीं, हौशी उद्योगाचीं.

आणि शोभलें घर बाळांनी, मुलगी होतां पहिली,
रुदन ऐकुनी, हृदयीं त्याच्या जाणिव थोर उदेली—
‘ की पै–पैसा मिळकत अपुली शिलकेमाजीं जावी,
उत्तम जपणुक हिजला सदनीं बाळपणांत मिळावी !
आणि आपुली वा ॲनीची होय जशी आबाळ,
हिची न व्हावी ! ’—वदतां गेला दो वर्षांचा काळ !
पुनरपि, सुंदर मुलगा होतां, झाला आठव याचा,
बाळ गोजिरा तिचा सोबती झाला एकान्ताचा !
कारण खवळुन दर्या जातां, अथवा दूर विदेशीं—
इनॉक असतां, बोलायाला होतें कोण तियेशीं ?
आणि खरोखर शुभ्र तयाचा घोडा जो तो जाणी,
सागरमासे परिमळले जंव पाटींतुन तो आणी;
आणि समुद्री हिमझुळुकांनी राकट लाल तजेला—
येइ मुखीं, तो परिचित होता चौकांतिल जनतेला—
असें नव्हे, तर सड्यामागल्या हिरव्या बोळांतूनी,
सिंहमुखाची दिसे आकृती दारावर शोभूनी,
कापुन जेथे ‘ यू ’—झुडुपांचा मोर अंगणीं केला,
थेट तिथे तो शुक्रवारचे मासे द्याया गेला !

पुढती मानवनियती घडवी स्थित्यंतर तें घडलें !
उत्तरेस जें पंचक्रोशित बंदर मोठें वसलें,—
उद्योगास्तव इनॉक जाई तिकडे अधुनीमधुनी,
जळमार्गानें कधी, कधी वा अपुल्या घोड्यावरुनी,
एक दिनीं तो उंच शिडावर काम कराया चढतां,
पडुन आपटे खाली कोठे पाय जरासा सरतां !

‘ हात मोडला ! ’ कळलें, नेतां उचलुन अधिकाऱ्यांनी,
किति तरि महिने पडुन राहणें आलें मग अंथरुणीं !
त्यांतच ॲनी प्रसूत झाली, अशक्त जन्मे बाळ !
धंद्यामध्ये दुसरे घुसले; ये दुर्दैवी काळ !
बाळमुखींचा अन् ॲनीचा घास पळविला त्यांनी,
अंथरुणावर खिळून पडतां इनॉकला ये ग्लानी !
गभीर धीमा स्वभाव त्याचा भय देवाचें मानी,
निष्क्रिय वृत्ती उदासवाणी भरली मग शंकांनी !
स्वप्न तयाच्या कधी एकलें उघड्या डोळ्यापुढती—
सत्यस्वप्नापरी तरंगे, व्याकुळ होतां चित्तीं—
कीं,—‘ दारिद्र्यें घोर, जहालीं मुलें आपुलीं दीन !
हातावरती पोट चाललें आपत्तीने हीन !
आणि जियेवर प्रीति केली जीवनसर्वस्वाने,
भिकारीण ती होउन भटके दारीं दीनपणाने ! ! ’
नेत्र मिटुन तो करी प्रार्थना मग चित्तीं हतभाग—
‘ वांचिव त्यांना ! मजवर वर्षीं कसलीही तूं आग ! ’
आणि उघडतां डोळे, पाही धनी पुढे पूर्वींचे,
मालक अपुल्या नोकरींतल्या मूर्तिमंत नौकेचे !
आले होते आपुलकीने आज समाचाराला,
कारण त्याची पटली होती थोरी पूर्ण मनाला.
हळूच वदले—“ इनॉक ! अमुची नौका लवकर जाई,—
पहा चीनला, कर्णधारही तिजला कोणी नाही.
जाशिल का तूं ? अजुन पुरेसा असे तिला अवकाश,
सुटेल ती इथुनीच ! ” वदे तो—“ द्यावें का वचनास ? ”

आणि संमती सत्वर त्याने एकमताने दिधली,
समजुन चित्तीं, की या रूपें प्रार्थनाच निज फळली !

सूर्याचा पथ जसा ढगाने झाकळुनी टाकावा,
तरिहि फटींतुन किरण चुकूनी इळु एकादा यावा,
आणि सागरीं क्षितिजाजवळीं बेट करावें त्याने,
अन् अंधारीं आशा थोडी दावावी किरणाने,
त्यापरि दिसली तच्चित्तावर दुर्दैवाची छाया,
इनॉकला परदेशासाठी मालक येतां न्याया !
चिंता वाटे परी तया की आपण जातां दूर,
मुलें माणसें यांचें होइल काय ?—जाहला चूर !
आणि लागला बेत कराया, करुनी खोल विचार—
' काय विकावी नौका ? छे: ! पण, मजला ती प्रिय फार !
किती तुफानें आलीं, गेलीं, तींतुन आपण जातां !
घोडा ज्याचा त्यासच माहित, तशि ही अपुल्या हाता !
आणि अता ती विकावयाची ?—विकणें भागच आहे !
त्या पैशाने माल घेउनी दुकान थाटूं ना हें ?
त्यांतच घाळूं मग ॲनीला ! होइल तिज हें काम !
विकुन खलाशी-स्त्रीपुरुषांच्या वस्तू मिळविल दाम !
अशापरीने चालवील ती घर हें, आपण जातां;
व्यापार न का तिकडे कांही आपुल्यास ये करतां ?
दोन चारदा—पुन:पुन्हा वा व्यापारास्तव जाऊं,
अगणित खेपा करुन, घराला धनाढय होउन येऊं ?
आणि शेवटीं मालक होउन व्यापारी नौकेचे,
प्रचंड पैका मिळवुन, जीवन घालवुं सहजसुखाचें !

शिक्षण देउन संपन्न करूं गोजिरवाणीं बाळें,
दिन मौजेचे शांत घालवूं एकसंगतीं सगळे— !’

यापरि निश्चित केलें सगळें स्वमनीं पूर्ण विचारें,
आणि वळविलें पाउल त्याने घराकडे परभारें.
बाळ अजारी असे धाकुला, म्हणुनी शुश्रूषेने—
फिक्कटलेली ॲनी सेवा करित बसे चिंतेने !
प्रफुल्ल होउनि, हर्षोद्गारें झणीं पुढे ती झाली,
करांत नाजुक बाळ देउनी त्याच्या, हृदयीं धाली !
इनॉक घेउन तयास हातीं, कुरवाळी प्रेमाने,
अजमावूनी वजन करांवर, चुंबी वत्सलतेने;
धीर न होई परी मनींचा सांगाया तिज बेत;
दिवस उदेला दुसरा, तेव्हा वदला तो निजहेत !

मिळे अंगठी तिज लग्नाची तेव्हापासून आज—
निघे तयाच्या प्रतिकाराचा प्रथम तिचा आवाज !
प्रतिकारीं त्या, परि न आरडाओरड कधि ही झाली,
कधी विनवण्या, कधी रावण्या, कधि अश्रूसर आली !
दुःखभराने कधी चुंबुनी पुनःपुन्हा दिनरातीं,
कधि पायाशीं लागुन करि ती दीनपणाने विनती.
( कारण वाटे ‘ —यांतुन होइल दुर्दैवोद्भव खास ! ’ )
व्याकुळतेने मनांत येतां वदली ती हि तयास—
“ मजसाठी—प्रिय बाळासाठी, कीं न वाटतं कांही ?
जाउं नको तूं— ! शपथ गळ्याची !—विनती दुसरी नाही ! ”

परि न जिवाची पर्वा अपुल्या कधी तयाने केली !
गृहिणी, बाळें एकच यांची चिंता पोटीं धरिली.
आणि तिचें तो शांतपणाने सारें ऐकुन घेई,
दुःख वाटलें, तरि ही अपुला निश्चय न ढळूं देई !

विकली त्याने जुनी आपुली सागरसोबत नाव,
ॲनीसाठीं केला हुन्नर मालाचाच जमाव;
आणि आपुली रस्त्याकडली खोली लावुन पार,
कुठे मांडणी, मेज तिकोनी ठेवी माल-वखार.
घेइ सामता, कुऱ्हाड, करवत आणि हतोडा हातीं,
हदरून टाकी घरटें सुंदर कामाने दिनरातीं !
ॲनिस वाटे मृत्युफलक हा जणुं अपुलाच उभारी,
कारण भरलें घर कर्कश त्या आवाजांनी भारी !
दिन शेवटचा आला तेव्हा कामें सारीं सरलीं,
अपुरी जागा—हात कुशल पण—नीट लागली खोली !
निसर्ग ठेवी कळींत खचुनी रेणु, पाकळ्या, बीज,
त्यापरि लावी कौशल्यें तो जिथल्या तेथे चीज !
ॲनीसाठी शेवटच्याही दिवशीं खपुनी राही,
अन् माडीवर थकुनी झोपे गाढ, उजाडे तरि ही !

अन्य दिनीं तो वियोगसमय प्रातःकालीं आला,
प्रसन्नतेने, धीटपणें परि इनॉकने सावरला !
ॲनी वाटे जिवलग त्याला; न तरी हसुन तियेची—
थट्टा केली असती त्याने, आणि तिच्या भीतीची.

धीर, नम्र अन् भाविक परि तो झाकी अपुलीं नयनें,
माणुसकीशीं, दिव्यत्वाशीं समरस होई स्वमनें !
पत्नी आणिक बाळें यांवर आशीर्वच वर्षावे,
यास्तव गाढी करी प्रार्थना बोलुनि हें सद्भावें–
' होवो माझं कांहीही, पण ठेव सुखी तूं त्यांना ! '
आणि मग वदे स्थिती तियेला समजावुन देतांना,–
" ॲनी, माझा देवकृपेनं प्रवास होइल छान,
आणि आपुल्या सर्व सुखांची चढती होय कमान !
नितळ शेगडी, रसरसलेला आणि लाल अंगार–
स्वागत माझं करावया तूं सदनीं ठेव तयार !
कारण पोरी, परतुन येइन न कळे तुजला तोंच "–
पालख हलवी हळु बाळाचा वदतां वदतां हेंच–
" अशक्त, खुरटा किती असे ग ! बाळ लहाना गोड !
आणि म्हणुनि ही तीव्र लागते जिवास माझ्या ओढ !
वर्षो त्यावर देव कृपा !–तो बसेल मांडीवरती,
रिझवाया मी सांगिन त्याला परदेशांतिल गमती !
परतुन येतां भरिन तयाचं मन मी प्रेमानंदें;
चल ॲनी ! ये, ऊठ बघूं, चल, हास जरा पाहूं दे !

अशापरीने बोलत असतां ऐके तीही साश,
आशातंतुस मनांत देई कसाबसा अवकाश.
ओघ वळुन मग ' देव ', ' श्रद्धा ' यांवर, तत्त्वज्ञानें–
प्रवची त्याची तऱ्हा खलाशी देशी गभीरतेने !
ऐकत होते कान तियेचे पुनःपुन्हा तें सारें,
लक्ष उडालें दूर कुठे, नच शिरलें कानीं वारें !

की खेडयाची कुणी कुमारी घागर धारेखाली—
ठेवुन ओढ्याकाठीं, पाहे चकारुनी भवतालीं,
भरल्यावर ती उचलुन द्याया नित्य कुणी जो येई,
जीव तयावर लावुन सगळा, चहूकडे ती पाही,
आणि वाहुनी जातां घागर, दिसुन, न ये ऐकाया,
त्यापरि ॲनी ऐकत होती प्रवचन त्याचें वाया !!

वदे शेवटीं—" इनॉक असशीं किति तूं सुज्ञ शहाणा !
तरिहि वाटतं, की तव दर्शन न घडे पुनरपि नयना ! "
" खरं ! "—वदे तो, " घडेल मजला परि तव दर्शन बाई !
ॲनी ! माझं जहाज इकडुन या जळमार्गें जाई ! "
( दिवस कथी तो )—" बघ तूं दुर्बिण लावुन डोळ्यांपुढती—
शोधुन मजला, पहा मजकडं, क्षुद्र लेखुनी भीती !

आणि पातला शेवटांतला शेवटचा क्षण जेव्हा,
वदला—" ॲनी, जिवलग पोरी, धीर धरीं, हस ! " तेव्हा !
" मुलाकडं या पहा आणि मी परतुन येथे येई,
तोंवर राखी नीटनेटकं, जाणं भाग मलाही !
चिंता स्वमनीं न करीं कसली माझ्याविषयीं बाई !
आणि वाटतां काही, देवावरी विसंबुन राही !
तोच खरा आधार एकला; तोच न का परदेशीं—
पूर्वेकडल्या दूर प्रांतीं ? झालों आणि विदेशी—
त्याच्यापासुन दूर कधी का जाइन ? कुणि का गेला ?
सागर त्याचा काय नव्हे ? हा त्यानं त्यानं केला ! "

उठून घाली खिन्न पत्निच्या गळ्यांत मांसल हात;
विस्मित अपुल्या दोबाळांचें चुंबन घेई तात !

तिसरा रात्रीं तापुन, जागुन नुकता होता निजला,—
" नकोस उठवूं ! " म्हणी वदे, ती जातां उठवायाला !
" त्यास निजूं दे ! पण मी चुंबुन गेलों असं तयाला—
कसं कळावं ? "—खाटेवर मग ओठ लावि तो गाला !
ॲनीने तों जावळांतली कुरळी बट छाटून,
दिली तयाच्या हातीं किंचित् खिन्नपणेंच हसून !
घाईने बट आणि बोचकें घेउन गेला स्वकरीं,
हात पालवुन पुनःपुन्हा, तो पुढला मार्ग सुधारी !

ठरलेला दिन आला; दुर्बिण ॲनीने आणविली,
व्यर्थ जाहलें परंतु सगळें, मूर्ति न तिजला दिसली !
की डोळ्याला तिज ती लावुन घेतां आली नाही,
किंवा आले डोळे भरुनी, हात न वा स्थिर राही,
कुणास ठावें ! हात पाळवी परि तो धक्क्यावरुनी,—
दिसला नाही तिज तो, आणिक जहाज गेलें तिथुनी !!

टोक शिडाचें बुडलें तरि ती न्याहाळूनी पाहे,
परते पाउल, अन् डोळ्यांतुन घळघळ ओघळ वाहे !
आणि तयास्तव, माणुस गेल्यापरि, ती शोकें रडली !
इच्छा त्याची पुरी कराया व्यापारीं धडपडली !
देवघेव पण करावया ती नव्हती जन्मा आली,
आणि दुकानीं तिज न म्हणूनी कधी किफायत झाली !
करुन हुशारी तोटा भरुनी काढतां न तिज येई;
शक्य न खोटें वदणें; सांगुन फार, कमी वा घेई.
आणि मनाशीं भिऊन बोले—" काय इनॉक म्हणेल ! "
कारण आली तशीच अडचण कितीदा, संकटवेळ !

आणि तिने मग कधि तोट्याने विकला काही माल,
खरेदीसही खोट बैसली ! फसली ! होय हवाल !!
आणि कधि न जी वार्ता आली, आसावुन तीसाठी,
कशी तरी गुजराण करुनी, मुग्ध दुःखदिन कंठी !

बाळ तान्हुलें जन्मापासुन दुबळें आणि अजारी,
संगोपन करि आई, प्रकृती खालावे तरि भारी !
दुकान-धंद्यामुळे जहाली न कळे काय अबाळ,
किंवा पडुनी उणीव काही नीट न हो प्रतिपाळ,
किंवा औषधपाण्यासाठी नव्हता जवळी पैसा,
आणि म्हणूनी वैद्याभावीं प्रसंग आला ऐसा !
देवा ठावें काय जहालें ! परि काही दिन खिळुनी—
अंथरुणाला—आणि तिच्याही पुरतें येई न ध्यानीं—
आणि पिंजऱ्यांतुनी उडूनी अवचित जावा रावा,
त्यापरि देहांतून निसटला गरिब जिवाचा छावा !

दफन होउनी घरा परतली होती ॲनी नुकती,
वार्ता कळतां फिलिपमनाही तीव्र वाटली खंती !
प्रेमळ हृदया एकच लागे तिच्या सुखाची आस,
( इनॉक गेल्यापासुन तोही न कधी जाय घरास !)
टोचित होतें परि मन त्याला; असें राहतां दूर—
‘ छे ! छे ! भेटायास हवें तिज !’ बोले भरुनी ऊर !
‘ वाटेल तिला जरा दिलासा !’—वदुन असें, तो गेला;
दालन पुढलें शांत पाहुनी, प्रवेश पुढती केला;
बंद आंतल्या दाराजवळी उभा जाउनी राहे,
टकटकवी तो हळू तीनदा; कुणि न आंतुनी बाहे !

उघडुन गेला आंत, दिसे तो ॲनी करुणामूर्ती,
लहानग्याचें दफन करून आली होती नुकती !
आणि कुणाला भेटायासहि उत्सुक नव्हता दील,
भिंतिकडे मुख वळवुन गाळी अश्रू नेत्रांतील !
उभा ठाकुनी हळु मग बोले, लटपटले जरि पाय,—
" ॲनी, मजवर एक कृपेची पांखर घालिशि काय ? "
बोले यापरि, परंतु गेला चपापुनी तो स्वमनीं,
तशीच राहुन तीहि उत्तरे मग कंठीं गहिवरुनी—
" माझ्याकडुनी पांखर—? एकाकिनी दुःखितेकडुनी ? "
शोकावेगें उत्तरतां ती, तोहि विसरला स्वमनीं !
मार्दव-संकोचांचा हृदयीं होउन परि संग्राम,
जवळ जाउनी मग तो देई तिजला वचनाराम.

" तुझ्या पतीनं इनॉकनं जी इच्छा धरिली हृदयीं,
तीच वदाया आलों ॲनी, तुजपाशीं या समयीं;
नेहमीच मी म्हणतों ना की उत्तम आम्हांमधला—
बलशाली तूं मित्र निवडुनी प्रेमाने परिणियला.
कारण जडतां प्रेम, तयाने कष्टुनिया दिनरातीं,
सुफलित केली इच्छाविभवें अपुलीं हीं तुजसाठी.
आणि कुणास्तव, सोडुन तुजला अशी एकली, सांग—
कष्ट कराया जाय अतां तो ? सुखांत व्हाया दंग ?
पहावया जग ?— छे ! छे ! ॲनी मिळवाया धन गाठीं,
समृद्धिने त्या निजबाळांना शिक्षण द्यायासाठी;
तुझी, तयाची जशी जहाली गत, नच त्यांची व्हावी,
इच्छा कसली या परती ग, धरी मनीं तो भावी ?

आणि परतुनी घरास येतां, कळलें जर की त्याला,
अमोल गेलं व्यर्थ बाळपण, तें लागेल जिवाला !
खोंडापरि हीं बाळं फिरतीं उंडारुन मैदानीं—
स्वैर, तया हें कळतां जाइल आमरण व्याकळुनी !
आणि म्हणुनि तूं आता—! पण ग सांग खरं मजला ना !
जाणत आलों जन्मभरि न का आपण अन्योन्यांना ?
शपथ घालुनी तुज बाळांची, त्याच्या सत्प्रेमाची,
‘ नकार मजला देउं नको ! ’ हें एक तुला मी याची !
कारण, असलं मनांत तूझ्या, तर मग कसली भीती ?
इनॉक येतां करिल तयाची परतफेड निजरीतीं.
पण तूं म्हटलं ‘ हो ! ’ तर होइल ! सुखवस्तू मी घरचा,
शाळेमध्ये त्यांस घालुं दे; पुरवि कृपेनं वांछा !

तोंड फिरवुनी भिंतिकडे ती जशी बैसली होती,
तशीच बोले—“ धीर तुजकडं मज न बघाया वरती !
गोंधळुनी मन गेलं माझं, पिचुनी पुरतं जाय !
अन् आल्यावर तर तूं, करि मज दुःख पुरं असहाय ! !
आणि अता वर कृपा तुझी ही अंतर माझं चिरिते,
‘ इनॉक आहे कुशल कुठं तरि ! ’—विश्वासें या जगतें.
परत करिल तो सारं— ! पैका कधि तरि फिटुनी जाई !
परंतु केल्या उपकारांची फेड कधी का होई ? ”

“ देशिल ना मग अता अनुज्ञा ? ” फिलिप विनवुनी बोले,
वळुन, उठूनी ॲनी, त्यावर लावी सांसव डोळे !
क्षणभर ठरवी मुखीं तयाच्या उदार अपुली दृष्टी;
आशीर्वचनें पुटपुटलीं पण झाली स्वमनीं कष्टी !

अन् कर पकडुन, हस्तांदोलन करुनी आवेगाने,
लहानग्या ती परड्यामार्जी जाय झणीं वेगाने !
आणि फिलिप ही उचंबळूनी आंतिल सारे भाव,
गेला मागोमाग तियेच्या, काढायातें ठाव !

आणि पुढे मग पुस्तकपाट्या वस्तु देउनी कांही,
शाळेमाजीं मुलांस घाली प्रेमें तो लवलाही.
अन् सगळें हें केवळ हृदिंच्या आपुलकीने केलें,
प्रिय होऊन, प्रेमें त्यांचें चित्त हिरावुन नेलें.
गांवामधल्या आणि रिकाम्या अफवांचा शिंतोडा—
लागावा नच कधि ॲनीला यास्तव त्याचा ओढा !
भिउन तयांना प्रिय अंतरिची लपवी अपुली आस,
टाळाया हें, चुकुन कधीही जाय तिच्या न घरास !
पाठवि परि तिज भाजीपाला, फळें मुलांच्या हातीं,
कधी मोसमी गुलाबपुष्पें घरचीं त्या सांगाती !
ससे सड्यांतिल, वस्तु अन्य वा सुंदर मधुनी मधुनी;
ओसाडीवर पुकतां त्याची उंच पिठाची गिरणी—
‘ उंची आलें पीठ ! ’—कधी या मिषें भेट तें देई,
हेतु मनीं कीं, तिज वाटावा उपकार न हा काही !

परी फिलिपला तिच्या मनाचा कधि न लागला ठाव;
पडतां गाठी कृतज्ञतेचा हृदयीं भरला भाव !
तुडुंबलें मन भारावोनी, शब्द न फुटला वाचे,
म्हणुन तोटके शब्द न बोले कधि ती आभाराचे !

फिलिप परी सर्वस्व मुलांचें तिच्या अतासा झाला,
दुरुन धावलीं चौकांतुन तीं सहर्ष भेटायाला.
घर वा गिरणी यांचे मालक झालीं आता तींच,
इवल्या गमती-कागाळ्यांनी किटविति कान उगीच.
तटस्थतेने तो ही ऐके; कधि तीं लोंबकळूनी–
खांद्याला, वा त्याच्यासंगें रमत कधी खेळूनी.
आणि लागलीं म्हणावयाला त्याला प्रेमें–' ताता ! '
इनॉकला हळुहळू विसरलीं फिलीप पुढती येतां.
दोबाजूंच्या झाडांमधुनी समोर रस्ता जावा,
पहाटेस कुणि दुसऱ्या टोका माणुस एक दिसावा,
आणि नसावें ठाउक कोठे व्यक्ति पुसट ती जाई,
इनॉकची स्मृति तशी तयांना स्वप्नासम तों होई !
आणि सोडल्यापासुन घर वा, देश लोटलीं सालें–
दहा पुरीं, परि वृत्त न त्याचें कांही कानीं आलें !

आणि एकदा गंमत घडली सायंकाळीं सहजीं,
वेचायाला फळें जायचें ठरलें राईमाजीं;
केला मित्रांसह जायाचा तिच्या मुलांनी बेत,
आणि जायचें तिने ठरविलें प्रिय बाळांसमवेत.
' प्रिय तातांनी ' ( संबोधित तीं ऐसें त्याला ) ' यावें ! '
विनंतीस या कां ॲनीने निरोधुनी टाकावें ?
पुष्पपरागें अंग लपेटुन शुभ्र दिसे मधमाशी,
गिरणीमाजीं राबुन भरली मूर्त फिलिपची तैशी.
पाहुन त्याला वदलीं बाळें–" ताता ! आज चला ना ! "
नाकारी तो; परी ओढतां त्यांनी, ' ना ' म्हणवेना !

ह्मणुन त्याने दिली संमती तत्परतेने त्यांना,
कारण—ॲनी तेथ नव्हति का ?—गेले सर्वच रानां !

थकवा वाटे तिजला चढतां वरली अर्धी वाट,
आणि पाहिलें तिने सभोती न्याहाळूनी दाट.
तों राईची उतरण पसरी जेथें झुडुपी पांख—
खिडकड्यावर त्या पूर्वीच्या वळतां तीचे आख,
शक्ति गळाली सर्व तियेची ! उसाह्मुनी मग बोले—
" जरा बसूं या ! "—विश्रमुनी मग फिलिप तृप्तिने डोले.
बसतां दोघें मुलें उडालीं तेथुन आनंदाने,
लकेर, दंगा आणि आरडाओरड भरतीं रानें !
तेथुनि खाली थेट सटकलीं शुभ्र झेझलामधुनी,
उड्या मारुनी पायथ्यास तीं आणि उधळलीं विपिनीं !
शेंड्यावरले तुरे घ्यावया मोडुन फांद्या कांही,
वाकवुनी वा वर जाणाऱ्या चपळ तशा शाखांही,
देत अरोळ्या परस्परांना वेगें हाकारोनी,
स्वैर चहुकडे राईभर तीं फिरलीं धाधावूनी !

विसरे तिजला फिलिप क्षणभर परि बसल्यावर जवळी,
प्रसंग दुःखद मागिल इथला स्मरतां, कुठे न्याहाळी !
की होऊनी घायाळ कसे पूर्वी या राईंत—
श्वापदापरी कोलमडूनी पडलों अज्ञातांत !
नजर फेकुनी मग वात्सल्यें बोले—" ॲनी, ऐक !
किति आनंदें खेळतात हीं बाळें खाली, देख ! "

परि ती त्यावर शब्द एकही मुळि उत्तरली नाही;
म्हणुन म्हणे—" का ? दमलिस ॲनी ? " उत्तर ये न तरीही !
" दमलिस ?"—वदतां पुन्हा, घालुनी वदन करीं ती झाकी !
तोहि आंतुनी चिडल्यापरि, मन अपुलें बोलुनि टाकी—
" जहाज गेलं ! खास बुडालं कुठं तरी तें बाई !
उगाच का हा शोक ? कशाला झुरणी घोर जिवा ही !
चिंतेनं या जळून करिसी कां बाळांस अनाथ ? "
तोंच वदे ती—" छे ! छे ! माझ्या तें नव्हतंच मनांत ! !
परंतु न कळे—मज ही कां तें—असतां आनंदांत,
शब्द तयांचे मला एकलेपण कां जाणवितात ! "

ऐकुनि तें वच फिलिप जरासा अधिकचि जवळी आला,
वदला—" ॲनी ! व्यापुन राहे एक विचार मनाला !
तरंगताहे इतके दिन तो मनावरी वावरुनी,
की मजलाही न कळे केव्हा प्रथम शिरे तो स्वमनीं.
परंतु आता केव्हा तरि तो प्रकट, गमे, होणार,
बोलूं दे मज तुझ्या मनाशीं निराशलेल्या फार,
दशवर्षांच्या प्रदीर्घ काळापूर्वी सोडुन गेला,
ॲनी ! त्याची कसली आशा ? संभव आता कसला ?
सुखरुप तरि तो असेल का ! छे, सोडुन दे ती आस !
गरीब, गरजू बघुन तुला जिव तिळतिळ तुटतो खास !
मनासारखी मदत न करितां ये मज उघडपणानं,
कारण—! म्हणती स्त्रिया जाणती परमन चातुर्यानं !—
माझा आंतर हेतु कदाचित् असेल आला ध्यानीं !
एकच इच्छा की—तूं आता व्हावें माझी गृहिणी !

करिन पित्यापरि बाळांचा मी प्रेमानं सांभाळ,
पिता समजुनी खास लोभतीं मजवर हीं वेल्हाळ !
आणि तयांना समजुन अपुले मीही करतों प्रीती,
अशांत होशीं चिरंत गृहिणी, तर सौख्याला न मिती !
अस्थिरतेचे, दुःखाचे दिन देवदयेनं सरती,
येइल अपुल्या अजुन जीवना मधुर सुखाची भरती !
विचार कर तूं ! सुखवस्तू मी; नात्याचें हि न कोणी;
नसे काळजी कसली; नाही मजवर कसली गोणी !
तूं नि तुझीं हीं बाळं यांची चिंता एकच भार,
जन्मापासुन ओळख अपुली त्यांत असे साचार.
आणि तुजवरी प्रीती केली एक जिवाभावानं—
तुलाहि नव्हतं ठाउक तेव्हापासुन एकदिलानं !"

उत्तरली तों ॲनी बोलुन कोमल भावें त्याशीं—
"देवदूत तूं शुभकर अमुच्या खचित घरीं कुणी असशीं !
वर्षो तुजवर त्याची पाखर ! फळ त्याचं तुज मिळुनी—
मजपेक्षाही अधिक सुखी तुज फिलिप कुणी लाभूनी !
प्रीति दोनदा करितां येते ? इनॉकवर जी केली—
तुजवर करितां येइल ? न तरी, धरिसीं आशा कसली ?"
फिलिप उत्तरे—"इनॉकच्या तूं ॲनी खालोखाल—
प्रीती मजवर करिशिल, तरिही होइन तृप्त खुशाल !"
"असं ! असं !"—उद्गारे ॲनी, जणू निरुत्तर होई !
"थांब जरा ! प्रिय फिलिप जरासा !—जर का इनॉक येई—?
परि तो कसचा येतो आता !— वर्षभरी पण थांब !
कळतें कांही काय बघूं का !—वर्ष न कांही लांब !

थांब थोडका— ! ” फिलिप निसासुन बोले मग सोशीक,—
“ जन्मभरी मी असें थांबलों ! थांबेन जरा—! ठीक ! ”
“ तसं नव्हे रे ! ”—वदली ॲनी, “ वचनीं बांधुन घेतें ! ’
एक वर्षभर ! एकच— ! तुज मी वचन हवं तर देतें !
एक वर्षभर मीहि पाहतें ! थांबसीं न तूं काय ? ”
“ थांबुन राहिन ! ” फिलिप बोलला होउनि मग असहाय !

स्तब्ध यावरी दोघें झालीं, अविचल गेला काळ;
दिसे फिलिपला अस्त रवीचा तों विझणारा जाळ !
उंचावरती डॅनिश थडगीं किरण लंघुनी गेला,
रातगारठा येउन ॲनिस बाधे, म्हणुनी उठला.
आणि मुलांना दे आरोळी झाडीमधुनी खाली,
भरल्या हातीं लूट घेउनी तींही धावत आलीं !
बंदरांतल्या घरास गेलीं उतरुन खाली सारीं,
निरोप घ्याया फिलिप पुढे करि कर मग ॲनीदारीं,
आणि हळु वदे—“ ॲनी ! जेव्हा तव मन हळवं झालं,
गोष्ट काढिली मी लग्नाची— ! चुकलं !—माझं चुकलं !
वचनबद्ध मी सदा तुझ्याशीं; तूंच मोकळी असशीं ! ”
बोले स्फुंदत ॲनी—“ छे ! छे ! मीच बांधली तुजशीं ! ”

शब्द असे ती बोलुन गेली अपुल्या घरकामाला,
परि त्याचे वच वेधित होते अजुनी विकल मनाला !
“—आणि तुजवरी प्रीती केली एकजिवाभावानं—
तुलाहि नव्हतं ठाउक तेव्हापासुन एकदिलानं ! ”

तन्मयली ती यांत न तों, ये पुढला वर्षाकाळ,
आणि ठाकला फिलिप येउनी तिजपुढती तात्काळ !
तों आश्चर्ये प्रश्न करी ती–" काय, उलटलं साल ? "
" बघ बाहेरी फळं–" वदे तो, " पुनरपि होतिं रसाळ ! "
थांबे मग ती, अन् प्रश्न पुढे ढकली बोलुन कांही—
" नीट पहाया सर्व हवं ना ? क्रांति न मोठी का ही ?
एक मास मज विचारास दे– ! एकच अवघा मास !
वचनबद्ध मी, पूर्ण जाणतें ! फार न– एकच मास !
नेत्रीं दिसली तोंच फिलिपच्या जीवनांतली आस;
मद्यपिहाता कंप, तसा ये त्याच्या रुद्ध गळ्यास !
" घे ! घे तुजला वेळ हवा तो ! घे–" बोले तो, " बाई ! "
आणि कळवळा येउन त्याचा, रडली असती तीही !
आणि तरीही तिने लाविली लांबण वचपूर्तीची,
विश्वासार्ह न अशीं कारणें करुनी पुढती मनिचीं !
प्रीतीचा वा व्याकुळतेचा खरेपणा जणु पाही,
आणि तोवरी षण्मासांचा काळ उलटुनी जाई !

तों बंदरिचे कुटाळकंपू भविष्य अपुलें चुकलें,
द्वेषें म्हणुनी चिडले, जणु की त्यांचें कांही दुखलें !
कुणास वाटे फिलिपच खेळे क्षुद्र तिला लेखून;
कुणी म्हणे वश त्यास कराया तीच धरी ओढून !
कुणि इतरेजन साधेभोळे दोघांनाही हसले !
कारण त्यांचें मन तरि होतें कोठे त्यांना कळलें ?
आणि असाही एक आढळे की ज्याच्या हृदयांत–
दुष्ट कल्पना विषसर्पाच्या अंड्यासम वसतात,

मिस्किल हासत दोघांनाही सहज दोष तो लावी,
नीचपणाने ध्वनित करूनी कुत्सित कांही भावी !
भरुनि राहिली नयनीं संमति पुत्राची दिनरातीं,
जरि न बोलला शब्द एकही, ठेवुनि हें तो स्वांतीं;
अन् कन्या तिज लग्न कराया प्रिय ‘ ताताशीं ’ सांगे–
करण्यासाठी दूर गरीबी लकडा लावुनि मागे !
आणि गुलाबी वदन फिलिपचें करपवि झुरणी, चिंता !
बघुन सर्व हें अघोर चरका बसे तियेच्या चित्ता !

अखेर एके रात्रीं योगायोग असा की आला,
झोप न ये तिज, कौल म्हणूनी उठली लावायाला !
‘ इनॉक माझा खरंच असे का गेला सोडुन मजला ? ’–
प्रश्न भिववि हा, पाठ लागली जों नच अंथरुणाला !
अंधाराच्या काळया भिंती असती वेढुन भवती,
सहन न होई, भरतां हृदयीं अपेक्षिलेली भीती !
उठुन बसूनी शयनीं, चकमक काढुनि लावी दीप,
‘ पवित्र शास्त्र ’ स्वकरीं ओढी निकरानेच समीप;
आणि उघडुनी झडकरि पाही कौल मिळे का पानीं–
झरझर फिरवी बोट आपुलें पहिल्या ओळीवरुनी;
‘ ताडतरुतळीं–! ’ ओळ आढळे, बोध न कांही झाला,
उमजे अर्थ न, पुस्तक मिटुनी पडली झोपायाला.
स्वप्न दिसे तों–‘ इनॉक बसला कोठे ताडाखाली–
उच्चस्थानीं आणि मस्तकीं रविकिरणें चमचमलीं ! ’
‘ गेला स्वर्गीं, हाय ! ’ तिज गमे ‘ सुखी असे अन् गात–
“ गौरव, देवा, नित्य असो नव ! ”–गाणें हें स्वर्गांत !

पुण्यसूर्य हा शिरीं प्रकाशे ! बसला झाडाखाली—
त्याच, जयाचीं पानें मार्गी अनुगांनीं अंथरलीं ! '
आणि जाग ये, चित्तीं वाटुन—' सखा दिवंगत झाला !
स्वर्गी जाउन सुखांत नांदे, सेवित दिव्य पदाला ! '
वदे फिलिपला सुनिश्चयें मग बोलावुन बेभान—
" न कळे मज की विवाह आपण अता करावा कां न ? "
" शपथ सांगतों, अपुल्यासाठीं—" वदे फिलिप तत्काळ—
" शुभ हें होवो शीघ्रच तर मग, जर हें सारं ठरलं ! "

अन् शुभमंगल झालें त्यांचें आणि वाजल्या घंटा !
आणि वाजल्या घंटा, पडतां विवाहमाळा कंठां !
परंतु हृदय न कधि ॲनींचें आनंदानें भरलें;
जवळ कुणाचें तरि मार्गी नित पाउल वाटे पडलें !
आणि कुठूनी तरि कुजबुजणें केव्हा येई कानीं !
शब्द कुठुन ये, कोण बोललें न कधी आलें ध्यानीं !
म्हणुन एकली राहि न कधि ती, घरांत नसता कोणी;
वा बाहेरी न कधी जाई कोठे धाडस करुनी !
टोचत होतें असें मनाला काय सारखें आंत,
की रेंगाळे हात कडीवर शिरतांनाच घरांत,
आणि थरारे मानस ? होतें माहित परि की त्याला—
सहजधर्म हे भावति संशयभीतिग्रस्त मनाला !
कारण गेले होते तिजला कांहीं महिने आता;
नव संसारीं पूर्वस्मृतिचा आठव देई गाथा !
परंतु जेव्हा दिवस भरुनी, जन्मा ये नव बाळ,
थेट आपुली मूर्त आढळे, पाहुनि तिज वेल्हाळ !

मातृत्वाचा पान्हा हृदयीं पुन्हा उमळुनी आला,
आणिक सज्जन फिलिप जिवाचा एकच कलिजा झाला !
आणि हळुहळू गूढभावनाभीति मनीं फिरणारी—
अपाप सगळी अस्त पावली हृदयीं वावरणारी !

इनॉक होता कुठे ? तयाच्या ' भाग्यवती ' नौकेला—
वारा मिळुनी अनुकूल, तिने प्रवास सुखकर केला.
प्रथम खवळुनी जरि बिस्केचा उपसागर पूर्वेला,
ढकलुनि नौका, जीव जळाने केला अर्धामेला !
तरि शांतपणें विषुवृत्ता ती गेली ओलांडूनी,
' वादळभूशिर ' येतां धक्के खाउन जाय निघूनी !
अनुकूल प्रतिकुल वाऱ्यांच्या स्थिरचल सोडुन लाटा,
विषुवृत्तांतुन पुनरपि जाई काढित ती निज वाटा !
आणि आग्नेयेकडुन वाहुनी मग व्यापारी वारे,
सोनेरी बेटांत पोचले सहज मजेने सारे.
पूर्वसमुद्रीं आणि नांगरुन नौका पडली शांत,
आणि खरेदी कांही केली इनॉकनेहि तशांत !
राक्षस विद्रुप, सर्प सुनेरी—भाव तयांना येई;
विकरीसाठी, बाळांस्तवही, म्हणुन खेळणीं घेई.
परी अपेशी सफर तियेची ठरली परतघराची !
पहिलींवहिलीं सागरवळणें झालीं शांतपणाचीं.
आणि लाकडी स्त्रीप्रतिमेचे वक्षनयन भरदार—
अचल राहिले लहरींवरती जळमयपंखाकार !
शांत लागले सागर पुढती; अन् मग चंचल वारे;
आणि पुढे मग कितीक आले उलटे लोळविणारे !

आणि शेवटीं वादळ उठलें ! झाकुळलें आकाश !
लाटांवरती नौका फुटली ! प्रचंड झाला नाश !!
इनॉक आणिक दोन सोबती सोडुन, सारे बुडले !
अर्धरात्र ते तुटक्या दोराखांबांवरती तरले !
वाहत गेले किनाऱ्याकडे अचुक सकाळीं थेट !
समृद्ध निर्जनजलधींतिल तें होतें निर्जन बेट !

परिपोषाया जीवन नव्हती तेथे कसली वाण;
कंदमुळें वा कठिण, मृदु फळें यांचें बेट निधान !
माणसाळुनी गेलेल्यापरि होते दुबळे प्राणी;
दयेवीण नच अडचण कसली करावया जिवहानी.
तिथे झोपडी सागरसंमुख डोंगरगुंफेपुढती—
बांधुन, त्यांनी ताडपल्लवीं पाचटली ती गवतीं !
अर्धगुहा अन् अर्धझोपडी, खाद्यसमृद्धी भवती;
कडक परंतु सदा उन्हाळा, तृप्त न म्हणुनी असती !
त्रिवर्गांतला एक कोवळा वय सोळाचा पोर—
दुखावलेला होता रात्रीं नौकानाशें घोर !
मृत्युसवें तो शेजेवरती झगडे वर्षें पांच;
ते हि झगडले, परि तो गेला अखेर सोसुन काच !
उरले दोघे; तों एकाला सांपडलें तरुखोड,
नाव करावी त्याची म्हणुनी करु पाही तो फोड;
पोकळ व्हावें, म्हणुनि मित्र तें लागे जाळायास—
ताम्रमुखांच्या इंडियनांची तऱ्हा सेवुनी खास !
परंतु अग्नी वरती, खाली तीव्रपणें धगधगला;
प्रतप्त भूच्या उष्णाघातें तो प्राणाला मुकला !

आणि एकला इनॉक राहे !!—परि मित्रांच्या मरणीं—
वचन आंतुनी ऐकूं आलें—' धीर धरीं ! ' हें श्रवणीं !

बेटावरल्या डोंगरटोकावरी थाटली राई;
कुरणें, वाटा स्वर्गपथासम नागमोडिच्या कांहीं;
शेलाटे हे ताड तुऱ्यांचे किरीट लव लवलेले,
पक्षि—किड्यांची चमक, विजेचें तेज जणू चमचमलें !
विशाल वृक्षा विळखुन वेली लांब लोंबुनी खाली,
भूटोकापर्यंत तजेला चमके वैभवशाली !
तेजोविभवें भूवनितेच्या कंबरपट्ट्यावरलीं—
विषुवृत्ताच्या बेटामाजीं सुंदर त्याला दिसलीं !
परंतु पाहुन जें, आनंदें भरलें असतें हृदय—
चुकून हि दिसलें कधीं न त्याला मानवमुख तें सदय !
वा न ऐकला शब्द मानवी कधी कुठे भोताली,
अनंत गिरत्या जलविहगांची रवरव कानीं आली !
मैलोगणती लांबट लाटा कंगोऱ्यावर खडकीं—
मेघगर्जनेसम आक्रोशुन फुटती मारुन धडकी !
आणि वृक्ष जे प्रचंड फुलले पल्लवुनी टोकाला—
कुजबुज त्यांच्या शाखामधलीं येई ऐकायाला !
निर्झर खालीं धबधबुनी जो सागराकडे गेला—
ध्वनि गर्जुन त्या मात्र जळाचा केव्हा कानीं आला !
कधी किनाऱ्यावर फिरतांना, दिनभर सदनीं असतां,
सागरसंमुख गुंफेजवळी वा न्याहाळित बसतां,—
भग्नमनोरथ कर्णधार हा शीड दिसे का पाही;
कानावरती तों आदळले विविध ध्वनि हे कांहीं !

एकामागून एक लोटले दिवस भराभर ऐसे;
परि कोठेही शीड तयाला लाटांमागे न दिसे !
रोज सकाळीं तेच रवांचे किरण शेंदरी पडले !
ताडांमधुनी, झाडांतुन वा कडयावरुनी अडले !
पूर्व दिशेच्या पाण्यावरती चमचम किरणें गळलीं !
डोक्यावरुनी बेटावरती चमचम तीं झळझळलीं !
चमचम केवळ अन् पाण्याची पुन्हा पश्चिमेलाही !
भिरभिरणाऱ्या मग आकाशीं ठळक तारका कांही !
आणि पुन्हा संघर्षरवाने ओरडणाऱ्या लाटा !
आणि शेंदरी बाण पुन्हा ते—परि न शिडाचा फाटा ! !

बसे न्यहाळित अचल कुठे तो येथे वारंवार;
न्यहाळिताहे ऐसें दिसलें निदान रमतां फार !
एकाग्रस्थिर इतुका होई की सोनेरी सरडा—
येउनि बैसे अंगावरती केव्हा न कळे निधडा !
आणि स्वप्नावलींतुनी जें स्वप्न जागृतीमधलें—
निर्मित होउनि पुढे तरळलें, तेंच पछाडुन बसलें !
तरल कल्पना अथवा त्याची परिचित वस्तु, स्थानें—
आणि माणसें यांना स्पर्शित फिरलीं आवेगानें !
दूर कुठे तरि विषुवृत्ताच्या पलीकडे अंधारीं—
भारावूनी सान बंदरीं एका, स्वप्नविचारीं—
जिथे लोचना दिसलीं अपुलीं बाळें, किलबिल, ॲनी,—
घरकुल, चढता रस्ता, गिरणी, बोळ गर्द जे पानीं,
'यू-' झुडुपाचा मोर आणि तें मंदिर एकान्तीचें,
घोडा अपुल्या तो स्वारीचा, नौका—नशिब तियेचें !

हिवाळ्यांतली पहाटवादळ, उदास दंवलीं रानें,
सौम्य सरींचा पाउस, घपका तो कुजल्यावर पानें,
शिसरंगाच्या महोदधीचें आणि मुळुमुळू रडणें—
उघड्या डोळां स्वप्नसंभ्रमीं पाहे केविलवाणें !!

आणि एकदा ध्वनि कसले तरि कानीं कल्लोळूनी—
आनंदी, परि पुसट पातले कुठुनी फार दुरूनी !
श्रवणीं आले अन् घंटारव गांवदेवळामधले;
अंग शहारुन उठे ताडकन्, कां, न त्यासही कळलें !
पण बेटाचीं दिसलीं पुढती सौंदर्यें नावडतीं,
वृत्ति तयाची अन् सावरुनी आली भानावरती !
आणि तयें जर केलें नसतें सर्वस्वाचें ध्यान,
उपासकाला कधि न एकले वाटूं दे जो स्थान,
खचित न साहुन एकाकीपण, दुःखार्तानें स्फोट—
होउन, त्याच्या मृदु हृद्याचा फुटला असता कोट !

अशा परीने अकालभस्मी केस होउनी त्यांचे—
आले गेले वसंतवर्षा पुढचे किति वर्षांचे !
परि न लोपली कुटुंबियांना आशा भेटायाची,
पवित्र परिचित मायभूवरी पद वा ठेवायाची.
तोंच अकस्मात् एकान्ताची शिक्षा त्याची सरली;
धिमेपणाची पुण्याई वा न कळे अवचित फळली !
'भाग्यवती' नौकेपरि नौका एक तुफानावरती—
लोटत आली इथे, कराया गोड जळाची भरती !

नियुक्त सुटुनी मार्ग, पातली होती या द्वीपाला;
आलों कोठे आपण याची जाणीव झाली न तिला.

कारण सहजीं बेटावरलें धुकें फाटतां थोडें,
कुणा पहाटे दिसलें पाणी ओहळतांना गोडें !

मुग्धपणाने उंचावरुनी जळ खाली सरसरलें,
शोधाया तें म्हणुन खलाशी उत्सुकतेने आले.

अन् बेटावर येउन त्यांनी, फाकुन चार दिशेला,
आवाजांनी भरून किनारा, शोध झऱ्याचा केला !

श्रवुन शब्द ते आवेगाने डोंगरगुंफेतून—
'माणुस' पाहुन इनॉक खाली आला आनंदून !

केशश्मश्रू वाढुन, वदनीं एकान्ताची छाया—
दीनपणाची येइ, अमानुष पिंगट होउन काया !

विचित्र पोशाखाने येइ ओठ हालवित अपुले,
पुटपुटुनी अपुल्याशी अस्फुट, जणु वेडयासम चाले !

जिभेस शब्द न सांपडले, मग रागावुन अपुल्याशी—
करित खुणा ये, परि उमजेना करपल्लविही त्यांसी !

तरि पण नेउन नीट दावि तो गोडें ओहळपाणी,
त्यांच्यासंगें मिसळुन चाले ऐकत त्यांची वाणी.

आणि बोलणें ऐकुन त्यांचें, त्याच्या जिव्हेवरलीं—
किति वर्षांचीं मुग्धपणाचीं ढिलीं बंधनें झालीं !

खुणाभाषणीं समजावुन तो देई त्यांना कांही,
अन् भरल्यावर पिपें, तयाला सवें घेतलें त्यांहीं.

तिथे तयें मग कथा आपुली तुटक्या शब्दीं कथिली;
प्रथम कुणाला आकर्षकता तींत न मुळि आढळली !

परंतु हळुहळु विस्मित झालें श्रोत्यांचें मन भारी,
अन् कारुण्यें वितळुन गेलीं अंतीं हृदयें सारीं !
तयास कपडे, भाडेमाफी प्रेमें दिधलीं त्यांनी,
तोहि घालवी एकलेपणा त्यांच्यासंगें खपुनी.
आलें नव्हतें कुणि त्यांतिल परि त्याच्या देशाहून,
इष्ट न मिळलें उत्तर जातां पर्युत्सुक होऊन !
कंटाळा ये थांबुन थांबुन नौका जातां मंद,
जलप्रवासा असे सर्वथा अनुचित ती गतिबंध.
मंद समीरापुढे परंतू तरल कल्पना त्याची—
घराकडे धावून सारखी पुनरपि परतायाची !
आणि अखेरी ढगाळलेल्या चंद्राच्या छायेंत—
नौका जातां, शुभ्र कडयांची भेसुर दिसली भिंत !
तोंच मायभूशेतांतिल ये दंवला पहाटवारा,
प्रेमिकापरी ओढुन तो घे पोटीं श्वासें सारा !
अन् सगळ्यांनी त्याच सकाळीं करुन वर्गणी कांही,
‘ एकाकीजन ’ म्हणुन दयेने त्यास दिली लवलाही !
आणि किनाऱ्याजवळ जाउनी उतरवियेलें त्याला—
त्याच बंदरीं, जेथुन पूर्वीं तो होतांच निघाला !

शब्द एकही तिथे कुणाशीं इनॉक नाही वदला !
परि घराकडे—घर ?—कसलें घर ?—होतें का घर त्याला ?
निजसत्तेच्या घराकडे त्या, पाउल त्याचें वळलें !
तिसऱ्या प्रहरीं स्वच्छ रवीचे कर होते झळझळले !
पडे गारठा, पण तेजस्वी जरी पसरलें ऊन,
हळुहळु चाले तोही पुढल्या दोन्ही खिडींतून.

दोन्ही बाजुंस दोन बंदरें सागरतीरीं वसलीं,
धूसर वलयें पाणधुक्याचीं तोंच येउनी बसलीं.
लोपुन गेला लांबट रस्ता चमचमलेला पुढला,
थोडें थोडें निरुंद अंतर सोडुनि दोबाजूंला.
तयांत दिसलीं अस्फुट कोठें नांगरलेलीं शेतें,
सुकलेली वा झाडी, कोठे कुरणांमधलीं गवतें.
निकटनिपानी तरुंतुन बेसुर रॉबिनची ये तान !
धुक्यांतुनी ये गिरकत खाली मृतजड पिकलें पान !
दाट धुक्याचे थर बसले, तों मब्लूलता ये गाढ !
दिवा शेवटीं दिसे धुक्याने अंधुकलेला जाड !
चमक तयाची तोंडावरती पडली सहज वरुनी,
आणि पातला इनॉक आता येउनी—' त्या स्थानीं ! '

मंद पावलीं लांबट रस्ता निःशब्दपणें खाली—
चालुन येतां, अमंगलाची छाया उतरे भालीं !
आणि बाजुच्या दगडांवरती दृष्टी लावित येतां,
येउन पोचे घरास, जेथे वास ॲनिचा होता,
आणि तयावर जेथे केलें प्रेम तिने दिनरात,
आणि जन्मलीं बाळें, जातां सुखसालें तीं सात !
परंतु न दिसे तिथे दीप, वा शब्दहि ऐकुं न येई !
(' विकरीपत्रक ' मात्र धुक्यांतुन चमकत दारीं राही !)
चाचपडुनी म्हणुनि पावलें पुढती त्याचीं गेलीं—
अजुन खालती, आणि वदे तो—"मेली ? मज वा मेली !!"

थेट जाउनी खाडीसंनिध, गोदीजवळी त्याने—
खानावळिचा शोध घेतला, जुनीच जी तो जाणे.

सागफुलीने जुन्या, शोभला जिचा दर्शनी भाग,
जुनाट चिरल्या, किडल्या जागीं ठेपे जागोजाग !
त्यास गमे की मोडुनही ती असेल गेली खास,
परि तो गेला होता, ज्याने काढुन जपलें तीस !
आणि ' मेरियम् लेन ' चालवी धंदा, विधवा त्याची,
रोज येउनी खाली खाली बाजू नित्य नफ्याची !
आणि बोलके सदा खलाशी गजबज अपुली करिती,
तिथेच आता पूर्ण कोंदली निर्जननीरव शांती !
एकच जागा अनिकेतास्तव मात्र ठेविली होती,
इनॉक तेथे मूकपणें घे कितितरि दिन विश्रांती !

परि मेरीयम् असे दयाळू आणि बोलकी फार,
त्यास एकलें राहुं न देई भेटुन वारंवार.
आणि एकदा बंदरांतल्या अन्य कथांच्या संगें—
इनॉकघरची सर्व कथा ती वर्णुन त्याला सांगे !
परि पिचलेला, पोक येउनी, पिंगटलेला देह—
ती न ओळखी, दृढतर जडला जरी तयाचा स्नेह !
आणि कथा ती सांगे त्याला आपुलकीने सारी,
' लहानग्याचें मरण, गरीबी नित वाढत जाणारी,
आणि फिलिपने मुलास कैसें घालुनिया शाळेंत—
शिक्षण दिधलें, कधिची तिजवर केली प्रीति मनांत !
आणि तिचीही दीर्घसूत्रता देतांना होकार,
विवाह पुढती, आणि फिलिपच्या पुत्राचा अवतार !'—
ऐकुन त्याने सर्व घेतलें परी तयाच्या वदनीं—
छटा, भावना मुळिहि तरळली नाही कसली श्रवणीं !

असता कोणी श्रोता भाविक, गमलें असतें त्याला,
द्रववी न कथा त्याला इतुकी, जितकी कथणारीला !
संपवितांना आणि तियेचा दुःखावेगच फुटला—
"गरिब बिचारा इनॉक! कोठे जाउन पडला ! बुडला !"-
भावभरें मग हलवुन भस्मी शीर्षभाग तो अपुला—
शब्द त्यांतले अर्ध पुटपुटे—" जाउन पडला ! बुडला ! "
आणि आंतल्या दुःखार्तांने पुसट पुन्हा शेवटला—
शब्द घोळुनी, हलके ओठीं पुटपुटला तो—" बुडला ! "

पुन्हा तिचें मुख पण बघण्याची लागे त्याला झुरणी,
वदे मनीं—' मज किती वाटतं की तिथवर जाऊनी—
पाहावं तें गोड वदन मी पुन्हा एकदा डोळां,
जाणुन घ्यावं—जीव तिचा की सुखांत आहे भोळा ! '
मानगुटिस हा विचार बसुनी फार कष्टवी त्याला,
आणि सांजचा उठवुन, नेई वरल्या घरमार्गाला;
हिवाळ्यांतली उदासीनता वाढुन तेव्हा फार,
संध्येचाही प्रकाश जाई मळूल होउन पार !
जाउन तेथे टेकडीवरी बसुन बघे तो खाली,
अमुप स्मृतिंनीं वृत्ति तयाची मूकव्याकुळ झाली !
मागिलदारीं दुरुन खिडकिच्या चौकटींतुनी झोत—
तांबुस, पिवळा फिलिपगृहींचा चमकत ये सुखशांत !
आणि विहंगा आकर्षावें व्योमीं दीपगृहाने,
ठेचुन घेऊन शिर त्यावरतीं श्रांत मरावें त्याने,
त्यापरि येउन चमचमणारा प्रकाश दुरुनी जवळी,
आकर्षूनी लोचन त्याचे निजतेजाने कवळी !

टेकडीवरी उंच कडेला वसे फिलिपचें सदन,
उभे असे तें रस्तेबाजुस करुनी अपुलें वदन;
आणि मागल्या दारीं सुंदर फुलली चौरस बाग,
कडभिंतीला फाटक, मागे ओसाडीचा भाग.
आंत एक ‘ यू ’-झाड वाढलें जुनाट हिरवेगार,
आणि शिंपिच्या पाऊलवाटा होत्या भंवती चार.
तया विभागी पायवाट जी मधे, सोडुनी तीच—
भिंत चढुन तो बसला चोरुन यूच्या बुंध्याशींच !
आणि नशीबीं दुःखें वाढुन होतीं जीं ठेवियलीं—
भली बुरीं, तीं पाहि तिथुन, जीं सहजीं असतीं टळलीं !

चकमकणाऱ्या मेजावरती कांटे चमचे पेले—
चमचमले किति शुभ्र रुपेरी मांडुन ठेवियलेले !
रसरसलेली लाल शेगडी आणि तिच्या उजवीला—
एक वेळचा हीन लेखला फिलिप, प्रियकर दिसला !
आरोग्याने वदन गुलाबी होतें घवघवलेलें !
मांडीवरती बाळ घेउनी खेळ तयाचा चाले.
द्वितिय पित्याच्या खांद्यावरुनी आणि वाकुनी खाली—
उंच सुकेशा तरुण कन्यका—ॲनिच दुसरी--दिसली !
उंचविलेल्या करीं लोंबवी फीत लांब ती एक,
कडी तयाची नाचवि बाळा मोहविण्यास सुरेख !
हात बाळसेदार उचलुनी जाई तें पकडाया,
चुकतां, फसतां त्यांत लागती सर्वच ते हासाया !
आणि तयाला डावे बाजुस दिसली त्यांची आई !
बाळाची ही मौज बघुन ती वळुनी बाजुस पाही;

कारण होता पुत्र थोरला तिथेच बलवान्, उंच !
त्यास कथुन ती गंमत हासे, हसतां तोहि तसाच !

मृतवत् त्याच्या जिवांत आलें होतें जीवन आता,
तोंच आपुली—अपुली कसली आता ?—पाही कांता !
आणि बाळही तिचें—न त्याचें परि—तातांकावरती !
प्रेमळतेची ऊब घराची आणि पुरी सुखशांती !
आणि आपुलीं मुलें स्वतांचीं उंच, थोर सुकुमार,
आणि अन्य तो—नांदे अपुल्या जागीं जो अनिवार,
धनी आपुल्या हक्कांचा अन् बाळांच्या प्रेमाचा— !
पोटीं त्याच्या कालवलें, क्षण सुटला धीर जिवाचा !
अन् मेरीयम जरि कानावर यांतिल सगळें घाली,
श्रुतापरिसही दृश्यें ठरतीं अधिक प्रभावशाली,
म्हणुनी हदरून भेलकंडला, धरी परी तो फांदी !
अघोर कर्कश किंचाळी वा नतरी देता आधीं,— !
पण संयमिलें मानस त्याने; न तरी प्रळयतुतारी—
नाशी जीवन, तशीं, गृहसुखें असति निमालीं सारीं !

नंतर उठुनी चोरपावलीं वळला मागे तिथुनी,
कर्कश शिंपा पायतळीच्या वाजतील की म्हणुनी—
चाचपडूनी भिंतिस धरुनी कसेंबसें तो हातीं,
करीं सापडूं झीट येउनी पडतां, वाटुन भीती—
रांगत गेला गुडघ्यावरती हळु दारापर्यंत,
जाई, उघडुन तें, बाहेरी, वाटुन हृदयीं खंत;

बंद करी मग हळु पाठीशीं, जणुं रुग्णालयद्वार,
आणि मोकळ्या ओसाडीवर ये, होउन हळुवार !
आणि टेकले असते गुडघे ध्यानासाठी त्याने,
परि ते झाले होते दुबळे आधिच दुःखभराने !
धाडदिशी अन् पडुन पालथा बोटें त्याचीं रुतलीं—
ओल्या मातीमधे, प्रार्थनेमाजीं अन् मति रतली ! !

" हाय ! कठिण हें ! सोसवे न मज ! कां आणियलं मजला—
बेटावरुनी इथं तयांनी ! "—वदुनी ध्यानीं रमला !
" सर्वशक्तिमन् प्रभो ! एक तूं सकला वांचविणारा !
निर्जन बेटावरती दिधला तूंच जिवाला थारा !
ताता ! मज दे एकाकीला धीर आणखी थोडा,
तिज हें सगळं सांगायाचा आवर माझा ओढा !
सांगायाचं तिज न कधी हें, कधिहि न कळवायाचं !
कधि न भेटुनी तिच्या जिवाचं गृहसुख भंगायाचं !
बाळांचं ही माझ्या—! त्यांशीं बोलुं नये मी काय ?
ओळखतीं पण कुठं मला तीं ! जाउन कळवूं ?—हाय !
नको, नको तें ! दैवीं माझ्या वत्सल चुंबन नाही !!
बाळं माझीं— ! पुत्र, पोर तो ! कन्या ती—जणुं आई ! "

विचार, भाषा, निसर्गशक्ती क्षीण इथे होऊनी,
व्याकुळतेने मूर्च्छित झाला क्षण भूवर तो पडुनी !
परि मग उठुनी चालूं लागे फिरवुन तिकडे पाठ,
परत आपुल्या एकलकोंड्या धरी घराची वाट !!

अरुंद लांबट मार्ग उतरतां तुडवी पायाखाली,
थकल्या मेंदूवर तों बसले ठोके वरती, खाली—
‘ सांगायाचं तिज न कधी हें ! कधि हि न कळवायाचं ! ’
जणुं पाल्लुपद होतें कुठल्या गाण्याचें तें साच !

परि असुखी तो नसे सर्वथा; निश्चय त्याला जिववी;
इच्छाजीवनझरी, प्रार्थना, श्रद्धा दृढ वा निववी !
झुंझारपणा वृत्तीमधला कडवट जागिं फिरतांना,
सागरांतल्या गोड झऱ्यासम नवजीवन दे स्वमना.
वदे एकदा मेरिस—“ का ग ! ही गिरणीवाल्याची—
कांता, मजला सांगितली तूं कथा जिच्या लग्नाची,—
कधि न वाटते मनांत तिजला कांही शंका, भीति—
की पहिला पति जिवंत अपुला असेल कोठे जगतीं ? ”
“हो, हो ! किति तरि तिला वाटतं ! पण ती गरिब बिचारी ! ”
वदे मेरियम् केविलवाणी मुद्रा करुन विकारी !
“ जाउन जर तूं तिज सांगितलं, की त्याला मेलेला—
तुवां पाहिला नयनीं, वार्ता सांतवील ती तिजला ! ”
वदे मनाशीं मग तो—“ सोडुन गेल्यावर इहलोक—
कळेल तिज हें ! बघतों तोंवर कधि ये वरली हाक !
बोलुन ऐसें पोटासाठी शोधुन धंदा कांही,
काम करूं तो लागे, न रुचे त्याला भिक्षांदेही !
वेगवेगळ्या उद्योगीं तो हात चालवी अपुला,
कधी करूनी पिपें, कधी वा सुतारकामें रमला !
नावाड्यास्तव कधि माशांचीं जाळीं त्याने विणलीं,
बंदरांतलीं थोर जहाजें भरलीं आणि उतरलीं !

परंतु होई फारच थोडी मालाची ने-आण,
मिळकत होई मग बेताची, कधी तिचीही वाण !
पोटासाठी खपे परंतु नच आकांक्षा कांही,
जीवनगोडी म्हणुनि न वाटे, जीवर मानव राही !
अशापरीने वर्ष उलटलें आणि दिवस तो आला,
बंदरांत या गतवर्षीं तो जेव्हा परतुन घाला !
मळूलता ये केव्हा वदनीं, केव्हा बारिक ताप,
हळुहळु येई अशक्तता, मग होइ न कांही व्याप !
घरींच हिंडे फिरे, पडूनी खुर्चीमाजीं राहे;
आणि शेवटीं अंथरुणाला जीवित अपुलें वाहे !
परंतु दुखणें सर्व सोशिलें त्याने आनंदाने,
बाह्यांतरिच्या सर्व वेदना गिळुनी धीर मनाने !
आणि भडकल्या नौकेवरला जसा खलाशी पाही—
वारेवादळ येउन जातां, पावसांतुनी कांही,
आणि तयाला दिसतां नौका धूसर वाफांमधुनी—
वांचवावया निराशलेल्या जीवा, ये धावूनी,
हृदयीं दाटे आनंदाची अलोट त्याच्या भरती,
इनॉकला हो तसेंच, मृत्यू मोहरल्यावर पुढती !

मोहरलेल्या मरणामधुनी जीवविणारी आस,
विचारतंद्री लागे तेव्हा, दिसली एक तयास—
‘ इहलोका मी सोडुन गेल्यावरती कळेल तिजला—
की आमरण प्रीति करीं मी तिजवर भावभुकेला ! ’
मोठ्याने मग मेरीयमला हाकारून तो घेई,
बोले—“ बाई, गुपित मनीचं कथणं आहे कांही !

शपथ घ्यावया हवीस पण तूं, कथण्यापूर्वी सारें !
घे ‘ शास्त्राची ’ शपथ ! न गुपिता लागूं देईं वारें !
म्हण की यांतिल कथिन न कोणा, मृत जोंवर तूं नाही ! ”
“मृत !!” आश्चर्यें उद्गारे ती—“बडबडसीं तरि कांही !

बरा करिन मी तुजला बाबा, खरंच सांगतें तुजला ! ”
“ —घे आधी पण शपथ ग्रंथीं ! ”—निकराने तो वदला !
आणि शपथ ती अर्ध भीत घे ग्रंथीं ठेवुन हात,
करडे लोचन फिरवुन तिजवर, इनॉक बोले मात—
“ इनॉक आर्डन या बंदरिचा की तुज माहित आहे ? ”
“ माहित ? ”—वदली, “ ओळखितें मी जरी दुरूनहि पाहे !
तो ना ? हो, हो ! या रस्त्याने जाई स्मृति ये त्याची !
ताठ आपुली मान उंचवी, पर्वा करि न कुणाची ! ”
थांबत थांबत दुःखभराने मग तो वदला तिजला—
“खाली झाली मान तयाची ! कुणि न विचारी त्याला—!
वाटे मज की--तीन दिसांवर जीवन माझं आलं !—
मीच असें तो इनॉक आर्डन !! ”—थांबे कांही काल !
ऐकुन विस्मयलहर तिला ये, अविश्वास वा वाटे,
संभ्रमांत पण किंचाळीं ये विस्मित वदनावाटे !
आणि वदे—“ तूं ऑर्डन ! तूं—? छे ! दोन विती तुजहून—
अधिक उंच तो खासच होता ! ” मग तो वदे नमून—
“ पण देवानं असं आजला पुरतं मज वाकविलं !
एकान्तानं अन् दु.खानं काळिज माझं चिरलं !!
तथापि घेईं ध्यानीं की तो—तोच असे मी, ज्यानं—
वरिलं—पण तें नांव बदललं दोन वेळ लग्नानं !—

वरिलं मी तिज, जिनं लावलं लग्न फिलिपशीं आता !
बैस—! ऐक तूं ! ”—ऐकविला मग त्याने अपुला गाथा !
‘ सफर जळाची, नौकानाश नि जीवन तें एकाकी,
परतुन येणें घरास, गृहसुखदर्शन ॲनीचें की,
निश्चय अपुला आणि कसा तो पाळियला नेटाने ! ’
ऐकुनि अश्रू झणि ओघळले तीचे स्त्रीभावाने !
आणि मनीं तिज तळमळ वाटे कितिदा, की गावांत—
असेंच सगळ्या थेट जाउनी सांगावी ही मात,
आणि करावी माहित त्याचीं दुःखें सर्व जगाला;
संयमिलें मन परि भीतीने, दिधल्या वचनें त्याला !
मात्र वदे ती—“ डोळ्यादेखत बघ पण बाळं अपुलीं !
आणूं का मी जाउन त्यांना ? ”—आणि झणीं ती उठली—
उत्सुकतेने आणायाला तयांस, कारण त्याला—
मोह मुलांचा क्षणभर पडुनी, वचनीं तो रेंगळला ! !

परि अन्य क्षण येतां वदला—“ बाई ! अंतीं आता—
नकोस मजला अस्वस्थ करूं, लावुन असली ममता !
बैस जराशी पुन्हा ! पहा मी काय सांगतों ऐक;
शक्ति असे, तों मज बोलूं दे गोष्टी मनिच्या कैक !
स्वाधिन करितों मनोगतं हीं तुझ्या आज मी सारीं,
उचमळल्यावर संयमिलीं जीं हृदयीं भिरभिरणारीं !
भेटतांच ती, सांग तिला की—‘ तुज आशीर्वादून—
प्रार्थुन गेलों तुझ्या सुखास्तव, चिर मी प्रीति करून !
स्थित्यंतर तव, अंतराय हें—न तरी प्रीती केली—
तशीच, शयनीं निरावीसें जेव्हा शिर तूं माझ्याजवळी ! ’

अन् मातेपरि हुबेहूब जी दिसली माझ्या नयना—
कन्या माझी—ॲनी, तिजला सांग जाउनी वचना—
की ‘ शेवटला श्वास टाकिला आशीर्वादुन तुजला,
प्रार्थित देवाचरणीं मंगल चिरसुख तुज द्यायाला ! ’
अन् पुत्राला सांग—‘ तुला मी आशीर्वादुन गेलों ! ’
सांग फिलिपला—‘ तुलाहि आशीर्वचनें देत निमालों ! ’
कल्याणाविण अमुच्या न कधी अन्य चिंतिलें त्याने,
किति वानूं मी थोरी त्याची, करितां थोर मनाने !
मुलांस माझ्या इच्छा झाली कधि मजला बघण्याची—
त्यांस येउं दे—! बाप असें मी—! स्मृति न तया पूर्वीची !
येउं नये परि तिने कधीही—! कारण मृत मुख माझें—
बघतां भावी तिचें सुखाचें जीवन चिर कोमेजे !!
कुटुंबियांतिल माझ्या आता अंतीं उरला एक,
आलिंगन दे स्वर्गीं मजला प्रिय तो माझा लेक !
कुरळी बट ही पहा तयाची, तिनेच कापुन दिधली !
आणि अजूनीपावेतों मी जवळ असे वाहियली !
आणि असावी अशीच जवळी, वाटे मज, थडग्यांत;
परंतु आता मन पालटलं आहे हें इतुक्यांत !
कारण त्याला भेटेनच मी त्या स्वर्गीय सुखांत,
म्हणुन करीं घे !—दे तिज बट ही, झाल्यावर मी शांत !
वाटेल तिला जरा दिलासा तयाकडे पाहून !
आणि पटे ही खूण जिवाला की—‘ मी तोच **म्हणून** !! ”

वदतांना तो इथे थांबला आणि मेरियम् लेन—
भावभराने देई वचनें—“ हो ! हो ! सर्व वदेन ! ”

परि तो करडे डोळे फिरवुन न्याहाळुन तिज पाही,
अंतिम इच्छा पुनरपि बोले, देई वचनें तीही !

नंतर तिसरी रात्र उदेली—भेसुर काळी काया !
इनॉकवरती पडली होती लव गुंगीची छाया !
निद्रित असतां मूकपणें तो चलनहीन, निस्तेज,
मेरीयम ही पेंगत असतां न्यहाळतांना शेज,
धडाड येई प्रचंड लाटाध्वनि आपटुनी खडकीं !
प्रतिध्वनींनी घरें हदरलीं बंदरिं एकाएकी !
जागा होउन उठला तो, वर पसरुन अपुले हात—
ओरडला स्वर काढुन मोठा—“ शीड ! शीड ये आंत !—
सुटलों ! सुटलों ! ! ”—बोले ऐसें आणि पडे तो खाली !
शब्द न वदला पुढे, जिवाची यात्रा सर्व निमाली ! !

अशा परीने बलशाली हा वीर महात्मा गेला !
आणि तयांनी स्मशानभूवर जेव्हा त्याला नेला—
इतुकी यात्रा आजवरी कधि म्हणती नव्हती आली !
आणि कुणाचें होय न थडगें इतुकें वैभवशाली ! !

• • •

# रसग्रहण

टेनिसन्चें ‘ इनॉक ऑर्डन् ’ हें काव्य म्हणजे इंग्रजी वाङ्मयांत एक गाजलेलें व लोकप्रिय झालेलें खंडकाव्य आहे. यांत कवीने एका खलाशाच्या जीवनाची शोकान्तिका रेखाटलेली आहे. टेनिसन् हा एक श्रेष्ठ कलावंत होता. आपली कथा आकर्षक व परिणामकारक करण्यासाठी त्याने आपल्या कलेंतील सर्व कौशल्य या कथेंत ओतलें आहे. अगदी कथारचनेपासून तों ती संपूर्ण चित्रित करीपर्यंत त्याने आपली कुंचली अतिशय नाजुक हाताने चालवून वाचकांचें मन पकडून ठेवलें आहे. यासाठी ही कथा वाचतांना तीमधील कथा व तिची कलात्मक गुंफण हीं पहाण्यासारखीं आहेत. या दोन्हीहि गोष्टी आपलें मन कमालीचें रिझवितात व काव्य वाचून संपलें तरी मनावरची त्याची पकड जात नाही ! म्हणून हें काव्य वाचतांना त्यांतील कथासौंदर्य व निवेदनकौशल्य या गोष्टींकडे विशेष लक्ष द्यावयास हवें.

**ओळी १ ते ४० :**

या काव्यांत पहिल्या दहा ओळींत समुद्रकाठचें ‘ एक छोटेसें बंदर, जवळच असलेल्या डोंगराचे तुटलेले कडे, मधे असलेली एक खिंड व समुद्राच्या गोदीपासून डोंगराच्या एका टेकडीवर वरपर्यंत वसत गेलेलें छोटेसें गाव ’, यांचें वर्णन आहे. या वर्णनांत कांही विशेष स्थळांचा निर्देश आहे. समुद्रकाठची गोदी व तेथे पडलेल्या अनेक अडगळ वस्तू, सभोवतालचीं तांबूस कौलारें, टेकडीच्या चढणीवरील वळणें वळणें घेत गेलेला एकच रस्ता व त्याच्या बाजूचीं घरें, तिथेच असलेलें एक पडकें प्रार्थनामंदिर, पिठाची गिरणी, टेकडीवरील सडा, पलीकडील डॅनिश थडगीं व खोलगट खिंडींतील हेझलराई, हीं तीं सर्व स्थळें होत. हीं स्थळें अशीं आहेत, की या ठिकाणीं ‘ अ नि के त ’ या कथेंतील कांही ना कांही घटना घडलेलीच आहे. त्या दृष्टीने टेनिसन्नें निवडलेलें हें स्थळ अत्यंत समुचित असेंच वाटतें. या ठिकाणीं घडलेल्या घटना आपलें मन पुढे पुढे इतकें आकर्षित करून घेतात, की त्यांच्याबद्दल आपणांस विशेष आपुलकी वाटूं लागते, आणि प्रत्यक्ष त्यांवरून आपण

फिरतों आहों किंवा तिथे वावरतों आहों असें वाटतें. या स्थळांचें हेंच वैशिष्ट्य आहे.

या बंदरांत पडलेल्या सामानासुमानांत व तेथील वाळूवर झेपावलेल्या एका उंच खडकाच्या पोकळींत बंदरांतील तीन लहान मुलें खेळत होतीं. हीं तीन लहान मुलें म्हणजे–( १ ) एक छोटी सुंदर किशोरी 'ॲनी ली', ( २ ) पिठाच्या गिरणीमालकाचा एकुलता एक मुलगा 'फिलिप रे' व ( ३ ) एका खलाशाचा पोरका पोरगा 'इनॉक ऑर्डन्' हीं होत.

**पोरका...हिमखडकीं** : इनॉकला घरीं कुणींच नव्हतें. त्याचा बाप समुद्रांत प्रवास करीत असतां एका बर्फाच्या डोंगरावर नौका आपटून फुटून मेला होता.

**निळसर दुबळे नेत्र** : फिलिपचे डोळे निळसर होते, पण त्यांत त्याच्या दुबळ्या स्वभावाची छटा होती. बलदंड प्रतिस्पर्ध्यापुढे त्याचें कांही चालत नसे; तो लगेच नमतें घेई व मग त्याचे डोळे पाझरूं लागत.

**थोडी थोडी...खास** : खेळांत इनॉक व फिलिप 'ॲनी ही मला बायको हवी' म्हणून भांडले, की ॲनी तडजोड करी व म्हणे, 'असं भांडूं नका, मी दोघांचीहि थोडी थोडी बायको होईन.' खेळांत सहज म्हटलेले हे शब्द पुढे प्रत्यक्ष जीवनांत अक्षरश: खरे होण्याची पाळी आली व त्यांतूनच ही शोकान्तिका निर्माण झाली! टेनिसन्‌ने भावी दुःखान्त घटनेची दिलेली ही पूर्वसूचना विशेष हृद्य व कलात्मक आहे.

**४१ ते ५० :**

**तिला कळवळा...अनिवार !** : इनॉक व फिलिप या दोघांबद्दलच्या ॲनीच्या भावना वेगवेगळ्या स्वरूपाच्या होत्या. ती दोघांशीं वागतांना अगदी वेगळ्या तऱ्हेने वागे. या सर्वांचें सुंदर वर्णन टेनिसन्‌ने अगदी थोड्या ओळींत किती आटपशीरपणें दिलें आहे तें पाहा.

**५१ ते ६६ :**

**सुवर्णश्रेय** : पैसा हेंच यापुढच्या जीवनांतलें श्रेय असें इनॉकने मानलें.

**निजसत्त्वेची नौका...धाम** : एकदा जीवनांतली जोडीदारीण निवडली की मग इनॉकने ताबडतोब आपल्या डोळ्यापुढे 'पैसा, स्वतांची नाव व

स्वतांचें घर ' हें व्यावहारिक ध्येय कसें धरलें, त्यासाठी धडपड कशी केली, त्यांत सिद्धि कशी मिळविली हें पाहण्यासारखें आहे. आणि हें सर्व करण्यामागे ॲनीवरचें नितान्त प्रेम हीच प्रेरणा कशी होती, हेंहि लक्षांत घेण्याजोगें आहे. इनॉक हा धाडसी, भाविक व कर्तृत्ववान् प्रेमिक होता. ध्येय व व्यवहार याची त्याने सुंदर सांगड घातली होती आणि हेंच त्याचें वैशिष्ट्य आहे.

**आणि वर्षभर...समर्थ तो अधिकारी** : आपल्या ध्येयाला अनुसरून इनॉकने अगदी थोड्या अवधींत केवढें नांव मिळविलें व खलाशी जीवनांतील किती निरनिराळ्या प्रकारचे अनुभव घेतले ! तसेंच वयाच्या एकविसाव्या वर्षीं आपलें ध्येय त्याने कसें गांठलें तें पाहा.

**नाव खरेदुन......रस्त्याने** : ध्येयवादी इनॉकच्या प्रेमभावनेला व्यवहाराची व उद्योगाची अतिशय योग्य अशी जोड मिळाल्यामुळे त्याच्या आकांक्षा कशा पुऱ्या झाल्या तें पहा. जिच्यावर ध्येयवादीदृष्टीने प्रेम करावयाचें तिच्या जीवनांतील सुखाची सर्व जबाबदारी आपण अगोदर पतकरावयाची व ती सुफलित करण्याच्या मार्गाला त्यागी वृत्तीने ताबडतोब लागावयाचें, ही इनॉकसारख्या प्रेमिकाच्या मनाची बाजू ही एक विशेष संस्कृति किंवा मनाची ठेवण पाहण्यासारखी आहे. इनॉकचें हें फार मोठें जीवनमूल्य आहे.

**घरट्यापरि** : त्याचें घर एखाद्या पक्ष्याच्या घरट्यासारखें चिमुकलें पण सुंदर होतें.

६७ ते ८८ :

**सुवर्णसंधी...निघाली** : त्या बंदरांत पावसाळ्यांत हेझलराईत अनेक हौशी लोक जात असत; फलसंचय वनविहार व वनभोजन या मौजेच्या गोष्टी करायला त्या बंदरांतले लोक दरसाल तेथे जात असत.

**वडिल अजारी...समजे !** : या दहा ओळींत तीन महत्त्वाच्या घटना आहेत—( १ ) वडिल अजारी पडले म्हणून फिलिपचें मागे राहणें. ( २ ) टेकडीवर ॲनी व इनॉक यांचें एकान्तांत खेटून बसणें व ( ३ ) फिलिपच्या नजरेला तें दृश्य टेकडी चढतांना दिसणें. या त्या तीन

घटना होत. यांचा त्यांच्या जीवनावर काय परिणाम झाला हें पाहण्यासारखें आहे. कथेंतील समरप्रसंगाला येथेच सुरुवात होते.

**आणि चुंबनासाठी...भुकेला** : फिलिपचे निराश होणें व प्रीतीसाठी जन्माचाच भुकेला राहणें या गोष्टींनी टेनिसन्‌ने कथेंत हलके हलके सुखदुःखाचे रंग भरावयास कशी सुरुवात केली आहे, तें पाहा.

**८९ ते ११० :**

**आणि पुढे...द्याया गेला** : इनॉकच्या आयुष्यांतील अत्यंत सुखाचीं, चिरस्मरणीय अशीं हींच सात वर्षे. त्याची उद्योगप्रियता, धाडस हींहि येथे दिसून येतात. टेनिसन्‌ने या सुखाच्या पार्श्वभूमीवरच पुढील सर्व शोकान्त चित्र चितारलें आहे.

**१११ ते १४२ :**

**पुढती मानवनियती...फळली !** : इनॉकला झालेला अपघात, त्याचें अजारीपण धंद्यांत दुसरे लोक घुसले हें दुर्दैव, पैशाचा अभाव व दारिद्र्याचीं घोर स्वप्नें, इतक्या घटना या ओळींत टेनिसन्‌ने कशा ठिचून भरल्या आहेत. विशेषतः इनॉकचा भाविकपणा, प्रार्थना व प्रार्थनेला आलेलें फळ यांतच भावी दुर्दैवाचीं बीजें कशीं होतीं तें पाहा.

**१४३ ते १४८ :**

**सूर्याचा पथ.....येतां न्याया** : या सहा ओळींत टेनिसन्‌ने एक **प्रदीर्घ उपमा** ( होमेरिक सिमिली ) वापरली आहे. आपण नेहमी कवींनी छोट्या छोट्या उपमा किंवा पूर्णोपमा दिलेल्या पाहतों. परंतु ही उपमा प्रदीर्घ व जरा निराळ्या पद्धतीची आहे. इंग्रजी वाङ्मयांत अशा उपमा देण्याची चाल प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. मराठींत मात्र '**सुधारक**', '**आंबराई**' व '**आराधना**' या काव्यांत त्या पहिल्याने आल्या. इनॉकला अंधारांत एक आशेचा किरण दिसला, हें सांगण्यासाठी या प्रदीर्घ उपमेचा उपयोग करण्यांत आला आहे. जें संकट इनॉकवर कोसळलें, तें ढगांनी झाकुळलेल्या समुद्रप्रदेशासारखें भयाण होतें व त्यांत अगदी दूर दूर क्षितिजापाशीं वरून येणाऱ्या एका किरणाने पाण्यावर तेजाचें

छोटेंसें बेट केलें होतें, तें इनॉकला दिसलें. हें सर्व प्रदीर्घ उपमेने सांगण्यांत कवीने त्याच्यावरील संकटांची तीव्रता निश्चित वाढविली आहे.

**१४९ ते १६६ :**

**चिंता वाटे......एकसंगतीं सगळे** : या परिच्छेदांत इनॉकच्या मनाचीं झालेलीं अनेक आंदोलनें पाहण्यासारखीं आहेत. प्रथम मुलांमाणसांचा विचार, नंतर नौकेचा, मग ॲनीला एक दुकान घालून देण्याचा व शेवटीं परदेशीं व्यापार करून धनाढ्य होऊन परतण्याचा, असे अनेक एकामागून एक विचार आले आहेत. आणि हें सर्व कशासाठी तर एकाच ध्येयासाठी—की—'आपल्या मुलांना शिक्षण देऊन संपन्न करावयाचें—आपल्यासारखे त्यांचे हाल होऊं द्यावयाचे नाहीत!' टेनिसन् पात्रांच्या अंतर्मनांत विशेष कसा शिरतो व वावरतो, तें पाहा.

**१६७ ते १७६ :**

**यापरि निश्चित...निजहेत !** : ॲनी व इनॉक यांच्या जीवनांतील कधी कधी अगदी बारीकसारीक गोष्टी देखील टेनिसन् देतो व त्यांतच त्याची कला साठविली आहे असें वाटतें. या परिच्छेदांत, फिकटलेली ॲनी पुढे येणें, तिने बाळ त्याच्या हातांत देणें, त्याने त्याचें हातावर वजन अजमावणें, त्याचें चुंबन घेणें, पण आपल्या मनांतील परदेशाला जाण्याचा बेत मात्र ॲनीला त्या वेळीं न सांगणें, या गोष्टी अतिशय स्वाभाविकरीत्या आलेल्या आहेत. आपल्या मनांतील एखाद्या गुप्त विचाराला पत्नीची संमति मिळणार नाही, असें वाटल्यावर, तो ती तिला सांगण्याचें कसें टाळतो, ती गोष्ट पुढे कशी ढकलतो व अगदी नाइलाज झाला की ती मग कशी सांगतो, अगदी तसेंच येथे झालें आणि म्हणूनच हें अगदी स्वाभाविक व कलात्मक वाटतें.

**१७७ ते १९० :**

**मिळे अंगठी...न ढळूं देई** : ॲनीला इनॉकचा परदेशाला जाण्याचा बेत आवडला नाही. तिचें अंतर्मन तिला सांगे, की हें कांही बरें नाही!

यांतून कांही तरी वाईट उद्‌भवेल आणि म्हणून तिने इनॉकच्या बेताला प्रतिकार केला. आजपर्यंत ती पतीच्या बेताशीं पूर्ण समरस होत होती; पण आज तिने थोडा प्रतिकार केला. तोहि अगदी सौम्य शब्दांत, किंवा मुळूमुळू रडून ! इनॉक निश्चयी होता. पण तिला राहवेना. यापेक्षा ती अधिक काय करणार ? दोन विषम भावनांचें हें द्वंद्व पाहण्यासारखें आहे. आणि जेव्हां दुर्दैव कांही वाईट घडवून आणणारच असतें, त्या वेळीं निश्चयी मनुष्याचा कल आपल्या स्वतःच्याच विचाराला अधिकाधिक चिकटून बसण्याकडे कसा होतो, हें पाहण्यासारखें आहे. टेनिसन्‌ने हें द्वंद्व फार सुंदर व थोडक्यांत रेखाटलें आहे.

**१९१ ते २३८ :**

**नितळ शेगडी :** पाहुण्यासाठी किंवा घरांतून परगांवीं गेलेल्या स्वकीयांसाठी तो परत येण्याच्या वेळेस ' रसरसलेली शेगडी ' तयार ठेवणें ही इंग्रजी राहणीमधील अगत्याची भावना दाखविण्याची एक पद्धति आहे.

**विकली त्याने...त्याचें वाया :** इनॉक जितका भावशील होता तितकाच व्यवहारी होता. एकदा परदेशीं जाण्याचें ठरल्यावर तो त्या कामाला लागला. आणि त्याने सर्व बाजूंनी आपली तयारी कशी केली याचें वर्णन या ओळींत आहे. ॲनीच्या भावनेची त्याने चुकून देखील चेष्टा केली नाही; उलट त्याची भक्तिभावना जागृत झाली व आपल्या कुटुंबियांवर ईश्वरी कृपा असावी म्हणून त्याने ईश्वराची प्रार्थना केली. आपल्या भावी प्रवासाबद्दल ॲनीशीं बोलतांना, पाठीशीं असलेल्या लहानग्याच्या पाळण्याला त्याने अगदी स्वाभाविकपणें हलकेच झोका कसा दिला, तें पाहण्यासारखें आहे. टेनिसन् ज्या वेळीं मनुष्याचें अंतरंग दाखवितो त्या वेळीं त्याच्या बारीकसारीक कृति वर्णन करून तो त्यांत रंग भरीत असतो. अशांपैकीच या परिच्छेदांतील हें दृश्य आहे. त्याचप्रमाणे ॲनीबद्दल त्याला नितान्त आदर व गाढें प्रेम हीं वाटत होतीं; व त्याचें प्रत्यंतर ' त्याची प्रार्थना, पाळण्याला झोका देणें, ॲनीला रसरसलेली शेगडी तयार ठेवण्यास सांगणें, गंभीर प्रवचन करणें ' यामधे येतें. शेवटच्या घडा भरण्याच्या प्रदीर्घ उपमेनें तर दोघांच्या भावनांना टेनिसन्‌ने सफाईचा हातच दिला आहे.

२३९ ते २७० :

**वदे शेवटी...परि तव दर्शन :** ‘ इनॉकचें दर्शन पुन्हा आपणांस घडणार नाही ’ असें ॲनीला सारखें वाटे; पण ‘ आपल्याला ॲनीचें दर्शन होईल ’ असें इनॉक म्हणे. या दोन्ही वाक्यांत टेनिसन्ने पुन्हा एकदा पुढील दुःखान्त भविष्य सूचित करून, वाचकांचें मन अस्वस्थ केलें आहे ! कथानकाच्या भावी पर्यवसनाच्या सूचना द्यावयाच्या, पण शेवट सांगावयाचा नाही, नुसता अस्वस्थ होण्यापुरता संभ्रम उत्पन्न करावयाचा, यांत टेनिसन्च्या कलेचें वैशिष्ट्य आहे. तेंच येथे दिसून येतें.

**तोच खरा आधार एकला :** या काव्याचें वातावरण प्रामुख्याने खलाशी-जीवनाचें असल्याने, इनॉक जेव्हा जेव्हा उपमा देतो किंवा टेनिसन्हि जेव्हा एखादा दृष्टान्त देतो त्या वेळीं त्या उपमा वा ते दृष्टान्त खलाशी-जीवनांतले असतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यामुळे काव्याच्या वातावरणाला एकजिनसी स्वरूप येऊन त्याच्या कलात्मकतेंत भर पडली आहे. येथे ओळ २५१ मधे त्याने मुळांत ईश्वराला नांगराची उपमा दिली आहे व ‘ हाच नांगर आपलें जहाज स्थिर करतो ’ असें सुचविलें आहे. ‘ **जीवननौकेचा तो नांगर !** ’ असेंहि त्याचें भाषांतर होईल. तसेंच ‘ मी सागरावरच असेन व सागरहि त्यानेच नाही का केला ? ’ असें सुचवितांनाहि पुन्हा खलाशी-जीवनाचाच उपयोग करण्यांत आलेला आहे. जो तो बोलतांना उपमा-दृष्टान्त आपल्या धंद्यांतलेच देतो, या तत्त्वाचें पालन टेनिसन्ने फार स्वाभाविकपणें केलें आहे.

**चुंबुन गेलों......गाला :** ओळ २५९ मधे पाळण्यांत झोपलेल्या बाळाचें चुंबन घेणें व ओळी २६१-६२ मधे ‘ ॲनीने त्याच्या कुरळ्या केसांची बट कापून इनॉकला त्याची आठवण म्हणून ती देणें ’ या घडलेल्या घटना महत्त्वाच्या आहेत. विशेषतः दुसरी घटना कथानकाच्या दृष्टीने फारच महत्त्वाची आहे. ‘ इनॉकने जहाजावरून हात पालवला पण तो ॲनीला दिसला नाही ’ हें पाहून आपणांस फार वाईट वाटतें. या कथानकांत ‘योगायोग किंवा दैव ’ आपला भाग कसा खेळतात, हें विशेष पाहण्यासारखें आहे.

२७१ ते २९४ :

**टोक...दुःखदिन कंठी !** : ॲनीला घालून दिलेल्या दुकानांत खोट येणें, तिला कमालीचें दारिद्य येणें, लहानग्या मुलाच्या औषधपाण्यालाहि खर्च करण्याएवढे पैसे जवळ नसणें व त्यांत तो मरणें, हीं दुर्दैवें दाखवून ॲनीचें चित्र लेखकाने अधिक कारुण्यपूर्ण करण्यास सुरुवात केली आहे. भीषण शोकान्तिका ही एकदम येत नाही; ती हळूहळू चोरपावलांनी आपली वाटचाल करीत असते, त्याचें हें द्योतक कसें आहे तें पाहा.

२९५ ते ३५६ :

**दफन......काढायातें ठाव !** : 'ॲनी'चें मूल गेलें तेव्हा आपण तिच्या समाचारास गेलें पाहिजे' असें फिलिपला तीव्रतेने वाटलें; तो तिच्याकडे गेला. तिच्या गरीबींत तिला मदत करणें, तिच्या मुलांना शाळेंत पाठवून पर्यायाने इनॉकची एक इच्छा पुरी करणें व मधून मधून ॲनीकडे जाणें-येणें या घटना महत्त्वाच्या व अर्थपूर्ण आहेत. इनॉकची गैरहजेरी एकीकडे ॲनीची काळजी वाढवीत होती, तर फिलिपच्या मनांतील कोमेजलेल्या आशेला दुसरीकडे नकळत कोंभ येत होते. दोघांच्या हालचालींतील मानसशास्त्र पाहण्यासारखें आहे. त्यांतल्या त्यांत उपकार शक्य तों न घेण्याची ॲनीची वृत्ति तिच्या व्यक्तिमत्त्वाचें तेज अधिक वाढवितें यांत शंका नाही. तिचे—

> ......" **पैका कधि तरि फिटुनी जाई !**
> **परंतु केल्या उपकाराची फेड कधी का होई !** "

हे शब्द चिरस्मरणीय आहेत. नुसतें मुलांना शाळेंत घालायला परवानगी देतांनाहि 'इनॉक काय म्हणेल ? असे उपकार घ्यावे का ?' वगैरे हजारों कल्पना मनांत येऊन फिलिपला तसें करण्यास परवानगी देतांना तिला कोण कष्ट पडले आहेत, हें पाहिल्यावर तिच्यासंबंधी आपणांस अधिकाधिक आत्मीयता वाटूं लागते.

३५७ ते ४५६ :

**आणि पुढे...एक दिलानें** : टेनिसन्च्या कलेचा आणखी एक

नमुना पाहण्यासारखा आहे. प्रथम तो एक कांही तरी मोठा प्रसंग दाखवितो आणि नंतर त्यामुळे घडणाऱ्या त्याच्या पोटांतील बारीक बारीक घटना हलकेच दाखवितो; आणि परत या सर्व घटनांच्या समुच्चयांतून घडलेला वा घडणारा पुन्हा मोठा प्रसंग दाखवितो; आणि अशी साखळी शेवटचें पर्यवसान होईपर्यंत चालते. पर्यवसानाच्या रोखाने चाललेली ही प्रसंगघटनांची साखळी फार कलात्मक असते. मुलगा गेला व त्याचें दफन करून ॲनी असहाय स्थितींत घरीं परतली हा मोठा प्रसंग; आणि मग यांतूनच फिलिपचें येणें, मुलांना शाळेंत घालण्याची त्याने मागणी करणें, हळूहळू तिला मदत करण्याच्या मिषाने ‘ भाजीपाला, ससे, उंची पीठ ’ असें कांही भेट पाठविणें, आणि त्यांतच कधी घरचीं खास ‘ **गुलाबाचीं फुलें** ’ पाठविणें, हेझलराईत फलसंचयासाठी जाणें, टेकडीवर तो मागील दिवस आठवणें ’ या बारीक बारीक घटना घडल्या आहेत. आणि यांतूनच ‘ लग्नाची मागणी ’ करण्यासारखा पुन्हा मोठा प्रसंग दाखविण्यांत आलेला आहे. या घडलेल्या लहान-मोठ्या घटना, त्यांचा अनुक्रम व त्यांना लागणारा वेळ यांमधे मानसशास्त्रीय सुसंगति ठेवण्याचें टेनिसन्‌चें कौशल्य विलक्षण अर्थपूर्ण आहे.

**गुलाबपुष्पें...गृहिणी** : व्यावहारिक मदतीचे जिन्नस भेट म्हणून पाठवितांना त्यांतच ‘ घरचीं खास गुलाबाचीं फुलें ’ भेट पाठविण्यामधे टेनिसन्‌ने फिलिपच्या मनांतील सुप्त भावनेला न कळत येत चाललेल्या अंकुराची सूचना फार बहारीने दिली आहे. तसेंच ‘ **तूं व्हावें माझी गृहिणी** ’ हे शब्द उच्चारण्याआधी, ते उच्चारण्यासाठी त्याला किती पर्याय, किती धडपड करावी लागली तें पाहण्यासारखें आहे. या सर्व गोष्टी टेनिसन्‌चें मनुष्यस्वभावाचें ज्ञान निश्चित दाखवितात.

**इनॉकची स्मृति स्वप्नासम...** : ओळी ३८२ ते ३८६ मधील पुन्हा आलेली प्रदीर्घ उपमा पाहा. कांही तरी विशेष परिणाम घडवावयाचा असल्याने येथे **प्रदीर्घ उपमेला** किती चपखल जागा टेनिसन्‌ने शोधून काढली आहे.

**एकलेपण कां जाणवितात !** : फिलिप व ॲनी टेकडीवर बसलीं

असतांना मुलें खाली खेळत होतीं. पण याच दोघांच्या मनांत दोन निरनिराळीं दुःखें कशीं वावरत होतीं तें पाहा. फिलिपला आपलें मागील दुर्दैव दिसलें, तर ॲनीला मुलांची आनंदी आरडाओरडा ऐकून ' आपण जगांत एकटे आहोंत ! ' असें वाटूं लागलें. या एकटे वाटण्यामधे इनॉकसंबंधीचें दुःख आहे व पुढे फिलिपची जी मागणी येणार आहे, त्या घटनेशीं सांधा जोडणारी सुप्त मनोऽवस्था आहे. टेनिसन्‌ची ही सूक्ष्मता कांही विशेषच आहे.

**मनासारखी मदत...परमन चातुर्यानं !** : फिलिपला वाटणारा संकोच त्याने व्यावहारिक, सुंदर, योग्य कारणें देऊन व्यक्त केला आहे; आणि ' स्त्रिया दुसऱ्याचें मन चटकन् ओळखतात, ' असें म्हणून भावी मागणीच्या तो अगदी नजीक येऊन, संकोचाने अडखळून पण शब्दांनी सूचित करून थांबला आहे.

**माझा आंतर हेतु कदाचित...ध्यानीं** : आणि पुढे मनांतली इच्छा तिने ओळखलीच असेल असें तो गृहीत धरतो व ' आंतर हेतु ' (' आंतरः कोऽपि हेतुः ') हे शब्द उच्चारतो आणि मग तिने ' गृहिणीपद ' स्वीकारावें ही एकदम मागणी करतो. या मागणीपर्यंत येऊन पोचण्यास मनास पडलेले कष्ट, योग्य पण जबाबदारीचे शब्द शोधण्यांत झालेली धडपड व त्यांतील ध्वनि हीं सर्व अत्यंत हृद्य आहेत.

**४५७ ते ४८८ :**

**प्रीति दोनदां करिता येते ?** : फिलिपची मागणी ऐकून ॲनी विस्मित होते. पण तिच्या मनांतील खराखुरा एक प्रश्न एकदम उफाळून बाहेर येतो, आणि ती त्यालाच विचारते, " माणसाला प्रेम दोनदां करतां येतं का ? " या उत्तराने फिलिप गोंधळून गेला आणि तिचा रोख जाणून " इनॉकच्या खालोखाल तूं माझ्यावर प्रेम केलंस तरी चालेल, " अशी त्याने एकदम कबूली दिली. ॲनीला हें उत्तर अपेक्षित नव्हतें. आणि त्यामुळे तीहि गोंधळली आणि मग थोडा वेळ निरुत्तर झाली ! पण क्षणभर विचार करून, तिने त्याला थोडें थांबण्याची–वाट पहाण्याची–विनंति केली. प्रीतीच्या मागणींतील पहिल्या उच्चारानंतर दोघांच्या मनाचा उडालेला हा गोंधळ व त्या अनुसंधानाने झालेले संवाद टेनिसनने फारच खटके-

बाजपणाने व कौशल्याने लिहिले आहेत. या संवादाच्या शेवटीं " **थांबुन राहीन !** " हे फिलिपचे शब्द त्यालाच काय, पण वाचकाला देखील दुःखभराने असहाय करतात.

**तव मन हळवं झालं...मीच बांधली तुजशीं !** : आणि जेव्हा ते हिंडून परत वाटेवर ॲनीच्या घराजवळ आले, तेव्हां फिलिपने तिचा निरोप घेतांना 'प्रेम व्यक्त करण्यांत थोडी घाईच झाली व आपलं थोडंसं चुकलंच !' हें म्हणण्यामध्ये फिलिपच्या मनाची ऋजुताच दिसते. आणि मग तीं दोघेंहि दुसऱ्याला स्वातंत्र्य देऊन 'आपण मात्र बद्ध आहोंत' हें सांगण्यामध्ये विरोधाने नकळत, पण अभावितपणें एकमेकांच्या जवळ कशीं येत चाललीं आहेत, हें चित्र पाहण्यासारखें आहे. तसेंच " मी वचनबद्ध आहें, तूं मात्र मोकळी आहेस " किंवा " **छे ! छे ! मीच बांधली तुजशीं !** " या वाक्यातील दोघांचेंहि औदार्य नांवाजण्यासारखें आहे.

**४८९ ते ५०६ :**

**आणि तुजवरी प्रीति केली...काल उलटुनी जाई !** : ॲनीच्या मनांत यानंतर एक विलक्षण द्वंद्व चाललें होतें. एकीकडे-" तर मग फिलिप आपल्यावर कधींपासून प्रेम करीत आहे ! आपल्याला मात्र हें ठाऊक नव्हतं !"-ही एक भावना आणि दुसरीकडे-" पण इनॉक येईलहि कदाचित् !" हा विचार, या दोहोंचें तिच्या मनांत तुंबळ युद्ध माजलें होतें. आणि मग तिने फिलिपची मागणी कांही ना कांही तरी क्षुल्लक सबब सांगून पुढे ढकलण्यास सुरुवात केली. इनॉकची वाट अकरा वर्षेपर्यंत इतक्या उत्कटतेने पाहणारी ॲनीची प्रीति धन्य आहे, असें कोण म्हणणार नाही ?

**५०७ ते ५२२ :**

**तों बंदरिचे कुटाळकंपू....बसे तियेच्या चित्ता !** : ॲनीच्या फिलिपाविषयक विचारांस आणखी एका गोष्टीने जोराची चालना मिळाली. आणि ती म्हणजे, त्या बंदरांतील कुटाळकंपूंनी फिलिप व ॲनी यांच्यासंबंधी उठवलेल्या वेड्यावांकड्या कंड्या ! आणि अशा अस्वस्थ मनःस्थितींत प्रत्यक्ष तिच्या मुलाने व मुलीने तिला फिलिपशीं लग्न करण्याविषयी केलेली सूचना.

यांत आणखी एक भर पडली; आणि ती म्हणजे, फिलिपला लागलेली झुरणी आणि त्याच्या चेहऱ्यावरील तिला दिसणारी चिंता! या सर्व गोष्टींचा तिच्या मनावर हलके हलके परिणाम होऊन तिच्या अंतःकरणाला मधून मधून चरके बसूं लागले! प्रीति ही कितीहि जिवट असली, तरी या व्यावहारिक जगांत ती अखेर दुबळी आणि अपुरी ठरते हेंच खरें!

**५२३ ते ५४६ :**

**अखेर एके रात्रीं योगायोग** : अशा असहाय स्थितींत मनुष्याचें मन कौल लावून पाहण्याकडे वळलें तर त्यांत नवल नाही! ॲनीने मध्यरात्रीं उठून दिवा लावला, 'पवित्र शास्त्र' हातामध्ये घेतलें व आपल्या मनांतील इच्छेचा त्याला कौल लावला. हातांतील पुस्तक उघडून एका पानावर तिने एकदम बोट ठेवलें, तों "**ताडतरुतळीं!**" हीं अक्षरें तिला तिच्या बोटाखाली असलेलीं दिसलीं आणि मग तिने 'इनॉक खात्रीने समुद्रांत बुडून दिवंगत झाला, तो स्वर्गात ताडाच्या झाडाखाली आनंदांत बसला आहे! व खिस्त-सूर्याचीं किरणें त्याच्यावर पडलीं आहेत' असें दृश्य आपल्या मनाशीं स्वतः पाहिलें. त्याबरोबर तिने फिलिपला लग्नाचा होकार देण्याचें ठरविलें. कांही बाबतींत मनुष्याचे जे निश्चय लवकर पक्के होत नाहीत, ते मनांतील भोळेपणाने धार्मिक भावनेचा कौल लावतांच तात्काळ आकारास येतात. ॲनीच्या मनांतील ही खळबळ व तिचा निश्चय, हीं त्यांचीं उत्तम प्रत्यंतरें आहेत.

**पुण्यसूर्य हा......अनुगांनी अंथरलीं!** : पुण्यसूर्य म्हणजे खिस्त. खिस्ताने जेव्हा यरूशलेममधे ईश्वराचा गौरव गात पदार्पण केलें, तेव्हा त्याच्या अनुयायांनी त्याचा जयजयकार केला. या वेळची अशी कथा सांगतात, की या जयजयकार करणाऱ्या अनुयायांनी तो ज्या 'ताडाखाली' बसला होता त्याचीं पानें तोडलीं व तीं खिस्ताच्या मार्गावर अंथरलीं. ॲनीला '**ताडतरुतळीं**' एवढा कौल मिळतांच तिने कल्पना केली की इनॉकच्या डोक्यावर जो सूर्य प्रकाशत आहे तो एरवीचा सूर्य नसून, पुण्यसूर्य म्हणजे खिस्त आहे व ज्या ताडाखाली तो बसला आहे, तो ताड वर उल्लेखिलेला आहे. म्हणजेच स्वर्गातील ताडवृक्षाखाली तो बसला आहे. यावरून तिने निश्चित कयास

बांधला की इनॉक दिवंगत झाला व तो स्वर्गात सुखांत आहे, त्याच्यावर ईश्वराची कृपा झाली आहे. याचा परिणाम असा झाला, की सकाळीं उठतांच तिने फिलिपला आपला ‘ लग्नास होकार ’ असल्याचा निरोप पाठविला.

**५४७ ते ५६६ :**

**अन् शुभमंगल झालें...!** : आणि ॲनीचें लग्न झालें व देवळांतल्या ( चर्च ) घंटा वाजल्या व देवळांतल्या घंटा वाजल्या म्हणून ॲनीचें लग्न झालें हें लोकांना कळलें. परंतु अजुनहि मधून मधून तिला भीति वाटत होती; मधेच तिचीं पावलें वाटेंत थपकत, कुणी आपल्याबरोबर अदृश्यपणें चालत आहे असें तिला वाटे व घरीं आल्यावर दाराच्या कडीवर हात ठेवून ती विचार करीत किती तरी वेळ उभी राही; कारण तिला वाटे ‘ दार उघडलें आणि समोर इनॉक दिसला तर ! ’ पण, तिला आता कांही दिवस गेले असल्याने, व ‘ असें कांहीतरी भितऱ्या माणसाला होतें ! ’ हें फिलिपला ठाऊक होतें म्हणून तो गप्प बसला होता. पण मातृत्वाची थोरवी ही कांही अपूर्व आहे. तिला मुलगा झाला व ती हें सर्व एकदम विसरली आणि तिच्या मनांतील सर्व किल्मिषें मावळून ती ‘ प्रेमळ आई ’ व ‘ उत्तम गृहिणी ’ म्हणून वावरूं लागली.

या परिच्छेदांत पुन्हा एकदा टेनिसन्‌ने तिच्या मनाच्या विविध अवस्था व त्यामागचें मानसशास्त्र सुरेख चित्रित केलें आहे. त्याने काढलेलें हें तिच्या मनाचें चित्र म्हणजे पर्यायाने तिच्या लग्नाचें व स्थित्यंतराचें समर्थनच होय. टेनिसन्‌ला जणु कांही असें म्हणावयाचें आहे की, ॲनी ‘ मनःपूतं समाचरेत् ’ या न्यायाला धरून वागली. तिने प्रत्येक पाऊल विचारपूर्वक टाकलें. ती इनॉकला विसरली नाही, त्याचें स्मरण ती पदोपदीं करीत होती, हें जितकें खरें तितकेंच, मातृत्व आल्यावर ती तें सर्व विसरलीं हेंहि खरें. या विरोधांत विलक्षण रस भरला आहे व टेनिसन्‌ने तो मोठ्या चातुर्याने व कौशल्याने वर्णिला आहे !

टेनिसन्‌ने ॲनी व फिलिप यांची कथा इथेच संपविली व एकदम तो ‘ पण इनॉकचें पुढे काय झालें ? ’ या कथेकडे वळला. म्हणून या काव्याचा अर्धा टप्पा इथेच संपला.

**५६७ ते ६४४ :**

**इनॉक होता कुठे ?......‘ धीर धरीं ! ’ हें श्रवणीं !** : ॲनीची कथा ऐन भरांत सोडून देऊन, आपणांस कवि इनॉकची कथा सांगू लागतो; आणि जों जों आपण इनॉकच्या जहाजाबरोबर निरनिराळ्या समुद्रांवरून फिरत जातों, तों तों आपणांस नवीच सृष्टी व नवीं सौंदर्यें दृष्टीस पडतात. ॲनीच्या जीवनांत झालेल्या घडामोडी लक्षांत असून व त्याबद्दलचीं सुखदुःखें मनांत वावरत असूनहि आपण म्हणतों-‘ एक चित्र पाहिलं ! आतां हें दुसरं कसं आहे ? ’ आणि म्हणून आपण पुनः ताज्या उत्सुकतेने त्याच्या कथेकडे वळतों. यांत दुसरी एक मानवी ओढ आपल्या मनांत असते. ती ही की ‘ ॲनीचे इकडे असें असें झालें, पण इनॉकचें तिकडे काय झालें असेल ? ’ आणि हीच कल्पना आपली उत्कंठा वाढविते.

इनॉक हा कर्तृत्ववान् खलाशी, महत्त्वाकांक्षी संसारी गृहस्थ व भाविक भक्त होता. संकटें आलीं की त्यांच्याशीं झगडण्यांत त्याला धीर येई, त्याचा उत्साह वाढे; आणि परिस्थिति आटोक्याबाहेर गेली की तो ईश्वरावर भार टाकून विश्वासाने राही. ‘नौकेचीं अनेक वळणें, परदेशांतील खरेदी, मुलांसाठी घेतलेल्या वस्तु, घरच्या आठवणी, जहाज फुटणें, एका निर्जन बेटाला लागणें, तेथेहि बरोबरचे सोबती मरणें आणि तरीहि ‘ धीराने रहा ! ’ अशी ईश्वरी वाणी आंतून ऐकणें ’ या सर्व गोष्टी त्याचें थोर व्यक्तिमत्त्व आपणांस आधीच पटवितात; आणि मग या एकाकी ‘ **अ नि के ता ची** ’ कथा खरी सुरू होते. या दुर्दैवांत सुदैव एकच होतें, की ज्या बेटावर तो जाऊन पडला होता, तें निर्जन असलें तरी इतर सर्व गोष्टींनी समृद्ध होतें. पण तेथे कोणीहि मनुष्य नव्हतें, हें सांगण्यांत आपलें दुःख किती वाढलें आहे तें पाहा !

**भग्नमनोरथ कर्णधार हा शीड दिसे का पाही....परि न शिडाचा फाटा !** : इनॉकला बेटावरची फळांची व धान्याची समृद्धि नको होती. त्याला मनुष्याचा चेहरा हवा होता. तो तर त्याला दिसला नाहीच, पण शिडाचा फाटाहि दिसला नाही ! दैव यापेक्षा आणखी कोणते कठोर खेळ खेळणार !

६४५ ते ६७२ :

**बसे न्यहाळित...पाहे केविलवाणें !** : एकान्तवास, निर्जन बेट व घराकडील आठवणी यांनी इनॉकची वृत्तीच पालटून टाकली ! अस्वस्थ वाटूं लागलें की, तो कुठे तरी एखाद्या टेकाडावर बसे व एकाग्रमनाने कुठे तरी दृष्टि लावून घराची व बायकामुलांची कल्पनाचित्रें रंगवीं. त्यांत तो इतका रमून जाई की त्याच्या अंगावर प्रत्यक्ष सरडा येऊन बसला, तरी त्याला कळत नसे. कुटुंबाचें प्रेम आणि पोटच्या मुलांबद्दलची माया, ह्या जीवनांतील नाजुक गोष्टी आहेत ! टेनिसन् म्हणतो, की इनॉकची कल्पनाशक्ति इतकी तीव्र व वेगवान् होई की, ती त्याच्या घरच्या परिचित वस्तूला स्पर्श करीत करीत पुढे जाई आणि परते, पुन्हा जाई, स्पर्श करी व परते, असें त्याचें चाललें होतें. आणि एकदां त्याला देवळांतल्या घंटा ऐकूं आल्या, असें त्याने म्हटलें आहे. घंटा एकून तो अस्वस्थ झाला ! पण नीट डोळे फाडून व कान टवकारून पाहतो, तों भोवतालचें जड बेटच समोर होतें ! पण त्याच्या हृदयांत देवावरील दृढ श्रद्धा होती. ती नसती तर, तो त्या दुःखावेगाने मेलाच असता ! वरील पंक्तींत घंटेची कल्पना मोठी रम्य आहे. टेनिसन्ला पुनरुक्तीची फार सवय आहे तो अनेक घटनांची, प्रसंगांची किंवा बारीक-सारीक गोष्टींची पुनरुक्ति करतो. पण ती अशा कौशल्याने करतो की, त्यांचा वाचकांवर मानसशास्त्रदृष्ट्या अचूक परिणाम होतो. म्हणून त्याच्या सर्व '**पुनरुक्ति गोड**' असतात. फिलिप डोंगर चढत असतां ॲनी व इनॉक खेटून बसले आहेत हें दृश्य त्याला दिसणें व कालांतराने, फिलिप व ॲनी त्याच ठिकाणीं खेटून बसणें, फिलिप व ॲनी यांच्या लग्नाच्या घंटा वाजणें व त्याच वेळीं इकडे इनॉकला देवळांतील घंटा ऐकूं येणें, वगैरे अनेक उदाहरणें पुनरुक्तीचीं म्हणून देतां येतील. या पुनरुक्तींत एका वेळीं आनंद असला तर दुसऱ्या वेळीं तीव्र दुःख असतें, आणि वाचक त्यावर हेलकावत राहतो. या पुनरुक्तींतून अनेक गोष्टी ध्वनितहि होतात आणि म्हणून '**गोड पुनरुक्ति**' हा टेनिसन्च्या कलेचा एक अंगभूत भाग झालेला आहे. घंटेच्या आवाजांनी आणलेली अबोध अस्वस्थता त्याच्या

ईश्वरावरील श्रद्धेने नाहीशी केली. इनॉकचें खरें सामर्थ्य या त्याच्या गाढ श्रद्धेंत होतें.

## ६७३ ते ७१२ :

**अशापरीने अकालभस्मी...अनुचित ती गतिबंध** ! : या बेटावर अशीं तेरा वर्षे गेलीं. इनॉकचे केस पिकले, त्याला पोक आलें. त्याचें शरीर पिंगटलें, दाढी व केस वाढल्याने तो जंगली माणसासारखा दिसूं लागला आणि तो मनांतून फार पिचून गेला ! पण त्याचें दैन्य तेरा वर्षांनंतर संपलें. समोरून एक जहाज येतांना त्याला दिसलें. हें जहाज या बाजूला चुकून आलें होतें. इनॉकला भयंकर आनंद झाला ! त्या जहाजाचा व इनॉकचा संबंध टेनिसन्‌ने गोड्या पाण्याने कसा जोडला आहे तें पाहा. त्या लोकाना इनॉक कसा दिसला, याचें वर्णन टेनिसन्‌ने फारच छान केलें आहे. एकविसाव्या वर्षीं जीवनांत सर्व तऱ्हेची समृद्धि करणाऱ्या समर्थ व सुखी इनॉकचें चित्र कुणीकडे आणि चाळीशी उलटतांना त्याला आलेलें भेसूर, जंगली, पिचलेलें स्वरूप कोणीकडे ! हीं दोन्ही चित्रें आपल्या डोळ्यापुढे उभीं राहतात व आपली इनॉकबद्दलची सहानुभूति शतपटींनी वाढते. माणसें पाहून त्याला आनंद झाला ! पण तो व्यक्त करण्यासाठी ओठ सवयीच्या अभावीं असमर्थ झालेले होते, हें पाहून त्याला वाईट वाटलें ! आणि आपल्यालाहि ती त्याची असहाय स्थिति पाहून वाईट वाटतें ! हीच टेनिसन्‌ची मनुष्याचें चित्र रेखाटण्यांतील विलक्षण करामत !

## ७१३ ते ७२२

**मंदसमीरापुढे...होतांच निघाला** ! : टेनिसन्‌ने इनॉकच्या चित्रावर वरील ओळींत फिरविलेला कुंचला फार बहारीचा आहे ! ज्या बंदरांतून तो निघाला होता तेथेच त्याला परत आणण्यांत पुनरुक्ति तर आहेच; पण तेरा वर्षे दूरच्या बेटावर फेकल्या गेलेल्या मनुष्याला मायभूमीच्या वाऱ्याने काय वाटलें, श्वास भरभरून हावरेपणाने तो, तो पोटांत कसा घेऊं लागला व ‘ एकाकीजन ’ म्हणून त्याला त्यांनी वर्गणी कशी दिली, हे प्रसंग आपलें हृदय पिळवटून घेतात ! दैवाचा हा दुर्विलास विलक्षण कठोर

आहे ! ज्या इनॉकने घरीं सर्व प्रकारची समृद्धि केली व धनाढ्य होऊन परत येण्याच्या महत्त्वाकांक्षेने जो घरून निघाला, त्याच्यावरच, लोकांनी वर्गणी करून दिलेले पैसे घेण्याची पाळी यावी, हें किती अघोर दुर्दैव ! टेनिसन्ने भरलेले हे रंग अत्यंत नाजुक, बिनतोड व हृदयस्पर्शी आहेत !

७२३ ते ७५० :

**शब्द एकही...मेली ? मज वा मेली ? :** येथून पुढे टेनिसन्ची कुंचली आपलें चित्र अलौकिक रंगांनी पुरें करीत असलेली दिसेल. त्याच्या कुंचलीचा प्रत्येक स्पर्श आतां कलात्मक होत आहे. अगदी ओळ ७२४ मधेच पाहा. ' तो न बोलतां **घरा**कडे निघाला ', हें सांगतांना—

**' परि घराकडे–घर ? कसलें घर ?–होतें कां घर त्याला ?**
**निजसत्तेच्या घराकडे त्या, पाऊल त्याचें वळलें ! '**

असे एका घरावर केलेले प्रश्न, घेतलेल्या शंका व निर्माण केलेले संभ्रम फारच हृद्य व हृदयस्पर्शी आहत ! टेनिसन् हा अतिशय मार्मिकतेने मनुष्याचें मन जाणतो व कथागुंफणींत अचुक घटनांची वा नाजुक कल्पनांची योजना करतो. त्यामुळे त्याच्या कथनाला रंगत येत जाते व त्या रसनिष्पत्तीवर वाचक वाहवत व त्याला दुवा देत मजेने पुढे पुढे जातो.

याच परिच्छेदांतील दुसरी गोष्ट म्हणजे इनॉकच्या घरमागावरील कवीने वर्णन केलेलें उदासवाण्या वातावरणाचें वर्णन ! आणि त्यांतहि—

**" निकटनिपानी तरुंतुन बेसुर रॉबिनची ये तान !**
**धुक्यांतुनि ये गिरकत खाली मृतजड पिकलें पान ! "**

यांतील दोन्ही भयाण कल्पना पाहा ! पहिल्या ओळींत आपणांस उदासवाणे-पणा व अपशकुन यांचा वास येतो, तर दुसऱ्या ओळींत आपणांस पिकल्या पानाच्या रूपाने मृतजड होत चाललेल्या इनॉकचें व त्याच्या भवितव्याचें भेसुर चित्र दिसतें ! आपलें मन अधीर होतें व आपल्या मनांत आधीच वावरत असलेली भीति वाढते ! टेनिसन् इनॉकच्या निरनिराळ्या मानसिक अवस्थेंतून भावनोत्कट विचाराने गेला आहे व त्यांचाच साक्षात्कार तो आपल्या भावनांतून आपणांस घडवितो. आपण अशा नाजूक मनःस्थितींत

असतों, तोंच पुन्हा आपणांस अनेक बारीक बारीक धक्के बसतात— इनॉक '**त्या स्थानीं**' येऊन पोचला, त्याला पुन्हा सर्व '**पूर्वस्मृति**' झाल्या ! त्याला दारावर '**विकरी पत्रक**' चिकटविलेलें दिसलें आणि आपल्या घराचें दार बंद पाहून त्याने '**मेली ? मज वा मेली !**' हे उद्‌गार काढले ! आपण या सर्व गोष्टींनी स्तिमित होतों व आपले डोळे पाझरूं लागतात ! '**मेली ? मज वा मेली !**' यांतील भावना व कल्पना आपल्या अंतःकरणाला चरकाच देतात !

**७५१ ते ७८४ :**

**थेट जाउनी खाडीसन्निध...तो–'बुडला !'** : एकामागून एक घटना घडूं लागल्या की टेनिसन् प्रसंग बदलतो व पुन्हा नवीन नवीन घटना घडलेल्या दाखवितो. यामुळे त्याच्या कथारचनेंत नेहमी ताजेपणा येतो; आणि प्रसंग अगदी स्वाभाविक व कथेच्या ओघांत आलेले असल्याने आपणांस निराळे कांही घडलें असें वाटत नाही. याला इनॉकची मनोरचना त्याला फार उपयोगी पडली आहे. इनॉक हा जसा हळवा आहे तसा तो धीर, धीमाहि आहे. घराला कुलूप लागलेलें पाहून लगेच त्याचा धीमेपणा जागृत होतो; तो जुन्या खाणावळीकडे वळतो, **अनिकेताचें** एकाकी जीवन घालवितो ! पुनः नवीन प्रसंग, नवीन घटना घडतात. आणि 'नको तें' त्याला तिथे समजतें ! 'मेरियम् लेन' या पात्राची योजना या दृष्टीने फारच समर्पक आहे. मेरियम्‌च्या सान्निध्यांत घडलेले सर्वच प्रसंग फार नाट्यमय आहेत व ते या कथेच्या परमोत्कर्षाला शोभण्यासारखे आहेत. बुडत्याचा पाय खोलांत जावा, तसें येथे झालें आहे. त्यांतील पहिला प्रसंग म्हणजे इनॉक मेरियम्‌च्या तोंडून 'आपण बुडलों व मेलों !' हें ऐकतो हा ! भयंकर दैवदुर्विलास तो हाच नाही का ? आणि टेनिसन्‌ने तो दाखवितांना इनॉकच्या तोंडीं प्रथम–'**गरिब बिचारा इनॉक कोठे जाउनि पडला ! बुडला !**' असे मेरियम्‌चे पुनरुच्चारित शब्द घातले. **पुनः त्यांतील थोडेसे म्हणजे–'जाउनि पडला ! बुडला !'** हे त्याने **पुटपुटलेले शब्द घातले व नंतर शेवटीं–'बुडला !' हा एकच शब्द भस्मी डोकें हलवून तो ओठांत पुटपुटत असलेला दाखविलें ! यांत त्याचे जों जों**

शब्द कमी होतात, गळतात तों तों आपल्या अंतःकरणांतील दुःखावेग वाढत जातो व शेवटीं त्याचा कळस होतो ! हीच ती श्रेष्ठ कला !

७८५ ते ८४० :

**पुन्हा तिचें मुख...निज तेजाने कवळी !** : अशा स्थितींत इनॉकला पुन्हा ॲनीचें दर्शन घेण्याची इच्छा झाली हेंच दुर्दैव ! पण ही इच्छा होणें अगदी स्वाभाविक आहे. आणि ती '**घडेल मजला परि तव दर्शन, बाई !**' या पूर्वोक्त वचनाला धरून असल्याने सुसंगत आहे. इनॉकने ॲनीच्या म्हणजे फिलिपच्या घरामागील परड्यांत रात्रीं जाण्याचें ठरविलें, ही एक भयंकर घटना होती ! तिची तीव्रता दाखविण्यासाठी टेनिसन्‌ने पुन्हा **प्रदीर्घ उपमा** ( ओळी ७८४ ते ७८८ ) घातली व विहंगाच्या मृत्यूने इनॉकच्या पुढल्या भवितव्याची पुन्हा सूचना दिली. त्यांतील ही सूचकता पाहण्यासारखी आहे.

**टेकाडावर उंच कडेला...निमालीं सारीं !** : आता कथेला गति आली आहे. शांत समुद्रांत ज्याप्रमाणे हळूहळू वादळ जमत जावें व मग पुढे लाटा, हलकल्लोळ व नौकानाश जवळ यावा, एक प्रकारची दंगल उठावी, घाई व्हावी व सर्व कांही झरझरझर होत जावें, तसें येथे घडत आहेसें वाटतें. इनॉकने टेकाडावर फिलिपच्या घरामागे जाऊन बसणें, तेथून ॲनीच्या गृहसुखाचें चित्र त्याला दिसणें, फिलिपचें गुलाबी वदन दृष्टीस पडणें व विशेष म्हणजे त्यांचीं मुलें-उंच हसरीं व सतेज समोर दिसणें-पण त्यांची भेट घेतां न येणें, या घटना हृद्भेदक आहेत ! त्या पाहून इनॉकने किंचाळी मारली नाही. पण वाचकाच्या हृदयांतून खास करुण किंचाळी बाहेर येईल ! सुंदर दृश्यें दाखवून त्यांतून कमालीचें कारुण्य निर्माण करण्याची टेनिसन्‌ची ही कला अलौकिक आहे, यांत शंका नाही. सत्त्व आणि रज यांतील हें द्वंद्व फारच रमणीय आहे !

**नतरी प्रलयतुतारी नाशी जीवन** : यामधे एक लक्षांत ठेवण्यासारखा पौराणिक संदर्भ आहे. ख्रिस्तीधर्माप्रमाणे अशी समजूत आहे, की जगाचा प्रलयकाळ ओढवतो, त्या वेळीं शेवटच्या दिवशीं मृत स्त्री-पुरुषांना ख्रिस्तासमोर तुतारी फुंकून बोलावण्यांत येतें, आणि त्या वेळीं त्यांच्या

ऐहिक कर्माकर्मांच्या अनुरोधाने त्यांच्याविषयीचा पुढील गतीचा निर्णय पुकारला जातो. या निर्णयानंतर सर्व जग विलयालाच जावयाचें असतें. ही गोष्ट जशी त्या तुतारीच्या एका आवाजाने होते त्याप्रमाणेच, इनॉकची किंकाळी जर बाहेर आली असती, तर तिने ॲनी व फिलिप यांच्या संसारसुखाचा नाशच झाला असता ! ती किंचाळी त्याने मारली नाही, संयम केला व त्यामुळे ॲनीचें गृहसुख भंगण्याचा अनर्थ टळला, असें म्हणण्याचा भाव. ही उपमा देऊन इनॉकच्या धार्मिक वृत्तीला टेनिसन्‌ने एक प्रकारचा भरीवपणा आणला आहे; इनॉकच्या संयमशीलतेची ही पुढली पायरी आहे आणि ती पाहून आपण विलक्षण स्तिमित होतों !

८४१ ते ८६० :

**नंतर उठुनी चोरपावलीं......मति रतलीं !!** : इनॉकची संयमशक्ति फार दांडगी होती. त्याचें मन फार खंबीर होतें. कारण त्याच्या पाठीशीं ईश्वरी श्रद्धेचा जोर होता. त्यामुळे कसल्याहि मानसिक झगड्यांत तो नमला तरी त्याने आपलें स्वत्व सोडलें नाही. फिलिपच्या घरांतून चोरपावलांनी बाहेर पडतांना भिंतीस धरून चाचपडत बाहेर जातांना किंवा 'मधे' रांगतहि जातांना, ॲनीला यांतलें कांही कळूं नये व तिचें गृहसुख भगूं नये यासाठी त्याची सर्व धडपड होती; पण किती झालें तरी तोहि मनुष्यच होता. त्याच्या शारीरिक शक्तीने तरी किती ताण सोसावयाचा ! तीहि दुबळी झाली होती. तो धाडदिशी पडला ! पण त्या अवस्थेंतदेखील तो प्रार्थना करूं लागला. 'प्रार्थनेने अनेक गोष्टी साध्य होतात' अशा अर्थाचें एक टेनिसन्‌चेंच वचन आहे, त्याचा या ठिकाणीं पुरेपूर अनुभव येतो; निदान इनॉकला मानसिक सामर्थ्य मिळण्यापुरती तरी त्याची साक्ष पटते.

**हाय ! कठिण !......ते गाण्याचं साच !** : या दोन्ही परिच्छेदांत इनॉकने घेतलेल्या एकाच ध्यासाचा—म्हणजे,

> **" सांगायाचं तिज न कधी हें, कधि हि न कळवायाचं !**
> **कधि न भेदुनी तिच्या जिवाचं गृहसुख भंगायाचं ! "**

या विचाराचा जयघोष आहे. इनॉक किती प्रेमळ होता व निश्चयी होता

याचें प्रत्यंतर या उद्‌गारांत व या निश्चयांत दिसून येतें; आणि हें सर्व ॲनी-वरील खऱ्याखुऱ्या प्रेमामुळे त्याने पतकरलें, हें पाहिलें म्हणजे अशा नायक-नायिकांना व त्यांच्या प्रीतीला धन्यवाद द्यावेसे वाटतात ! मनाचा खंबीर-पणा असून आणि वरील निश्चय केला असूनहि, मधूनच त्याला '**त्यांशीं ( मुलांशीं ) बोलुं नये मी काय ?**' अशा विचाराची उबळ येत असे; पण पुन्हा —

"**नको ! नको तें ! दैवी माझ्या वत्सल चुंबन नाही !**"

असें म्हणून तो त्या विचाराला लगाम घाली. या सर्व ओळींतून त्याच्या मनांत चाललेल्या द्वंद्वाचें वर्णन टेनिसन्‌ने फार समर्पकपणें केलें आहे. अशा स्थितींतहि इनॉकने आपलीं दुःखें गिळून किंवा सोसून आपल्या एकल-कोंड्या निवासस्थानाची वाट धरली व कसलीहि तक्रार केली नाही, हें त्याच्या खऱ्या महात्मतेचें गमक आहे.

**८६५ ते ९१० :**

**परि असुखी तो नसे सर्वथा :** इनॉकचें मन अशा एका उच्च पात-ळींत गेलें होतें की तिथे राहून तो त्यागांतील सुखाचा अनुभव घेत असे. आध्यात्मिक दृष्ट्या तो वरच्या दर्जाला गेला होता व त्याने षड्रिपूंपैकी अनेक रिपु जिंकले होते. त्यामुळेच त्याच्या अंतःकरणांत एक सुखाचा गोड झरा निर्माण झाला होता. हाच झरा त्याला जिववीत होता व त्याच्याकडून निष्काम कर्म करवीत होता. मधून मधून मेरीयम्शीं बोलणें, तिला ॲनीची हकीगत विचारणें, हें त्याचें चाललेंच होतें; पण त्याच वेळीं कांही तरी उद्योग करून पोट भरणें हेंहि चाललें होतेंच. पण त्यालाहि कांही मर्यादा आहेच. शरीर थकलें, मनहि थकलें ! हलके हलके तो आजारी पडला आणि अंथरुणाला खिळला ! त्याला समोर मृत्यु दिसूं लागला ! आणि तो स्थित्यं-तराचा प्रसंग येतांच टेनिसन्‌ने पुन्हा एकदा **प्रदीर्घ उपमा** ( ओळी ९०५ ते ९१० ) व तीहि पुन्हां खलाशी जीवनांतलीच घालून, त्याने मृत्यूची तीव्रता जाणवली. फरक इतकाच की या दृश्याने इनॉकला आनंद झाला, पण आपल्याला मात्र दुःख झालें ! मृत्यु समोर दिसल्यावर —

**‘ हृदयीं दाटे अलोट त्याच्या आनंदाची भरती ! ’**

ही अवस्था किति कठिण आणि दुर्मिळ आहे तें पहा. हीच इनॉकची अलौकिकता !

**९११ ते ९५० :**

**मोहरलेल्या मरणामधुनी......भावभुकेला !** : त्याच्या मनाला एकच समाधान होतें तें हें—

**‘ की आमरण प्रीति करीं मी तिजवर भावभुकेला ! ’**

आणि हें समाधान सर्वश्रेष्ठ आहे. त्यांत प्रीतीची धन्यता आहे, प्रीतीचा मोक्ष आहे, नव्हे, प्रीति ही या ठिकाणीं थोर भक्तीच्या पदावर गेली आहे. इनॉक जो आपल्याला अपार्थिव, स्वर्गीय वाटतो तो याच गोष्टींमुळे !

**मोठ्याने मग......दिधल्या वचनें त्याला !** : आतां इनॉकच्या मनाला शांति प्राप्त झाली होती; कर्तव्य केल्याचें संपूर्ण समाधान त्याच्या नसानसांत खेळत होतें. त्याचा आता सर्व गोष्टीबद्दल निश्चय झाला होता आणि म्हणूनच त्याने मेरीयमला मोठ्या विश्वासाने हाक मारली. यानंतर तो व मेरीयम यांमधे थोडा संवाद झाला. या संवादांत मेरीयमच्या उतावळेपणामुळे व फाजील आत्मनिष्ठ विश्वासामुळें थोडा विनोदहि निर्माण झाला आहे. इनॉकच्या या अंत्य अवस्थेमुळे आपल्या मनास जो ताण बसतो तो या अभावित विनोदामुळे कमी होतो व वाचकाला त्यामुळें बरें वाटतें. पुढे वाचणें त्याला सुसह्य होतें. वास्तविक मेरीयमच्या पुढेच साक्षात् इनॉक बसला आहे, पण तो इनॉकच आहे हें तिला माहीत नाही. त्यामुळे ‘तू या बंदरांतल्या इनॉकला ओळखतेस काय ?’ या त्याच्या प्रश्नाला जेव्हा ती उत्तर देते की, ‘मी ? मी त्याला लांबून चालला असला तरी सुद्धा ओळखेन,’ तेव्हा आपणांस या प्रसंगांतील विलक्षण दुर्दैवी नाट्य पाहून हसूं आवरत नाही. आणि या पुढचे संवाद असे आहेत, की ते करुण, वत्सल, अद्‌भुत व क्वचित् हास्य अशा अनेक रसांच्या मिश्रणांनी यत्रथत्रलेले आहेत. या संवादाची दुसरी मौज ही आहे की, इनॉकने प्रश्न विचारावा, तिने उत्तर द्यावें, की एक रस उत्पन्न होतो; आणि परत त्यावर जेव्हा पुन्हा इनॉक एकादें वाक्य बोलतो, तेव्हां करुणाचा वर्षावच होतो. उदाहरणार्थ, इनॉक

जेव्हा सांगतो की 'मीच तो ऑर्डन्!' तेव्हां ती म्हणते 'तू! तू ऑर्डन्? छे! छे! तो तुझ्यापेक्षा दोन विती उंच होता!' इनॉक दुःखभाराने वाकला होता हें वाचकाला माहीत असतें, व या वाक्याचा अन्वय तो मनाशीं बरोबर लावतो. परंतु तो मेरीयम्‌ला कसा लागणार? म्हणून ती प्रश्नांकित चेहऱ्याने स्तिमित होते, तोंच इनॉक म्हणतो—'**पण देवानं असं आजला पुरतं मज वाकवलं!**' आणि हें उत्तर ऐकतांच आपल्या डोळ्यांत टचकन् पाणी येतें! इनॉकच्या व्यक्तित्वाचें रहस्य टेनिसन्‌ने जें मेरीयमपासून लपवून ठेवलें आहे, त्यामुळे हा पुढील भाग विशेष रसाळ झाला आहे; आणि त्यांतील एकेक भाग जों जों मेरीयमला उलगडला जातो तों तों त्यांत अद्‌भुत, भयानक, रौद्र यांची भर पडते व ही शोकान्तिका दारुण होत जाते!

या संवादांत ॲनीचा उल्लेख करतांना इनॉक तो सर्वनामाने करतो हें एक पाहण्यासारखें आहे. बहुधा त्याला तें नांव उच्चारवत नसावें. 'ही गिरणी-वाल्याची कांता', 'ज्यानं वरिलं—पण तें नांव बदललं', 'वरिलं मी तिज,' असे इनॉकने केलेले उल्लेख अत्यंत सूचक व करुणहृद्य वाटतात. आणि मग इनॉकने आपली सर्व हकीकत तिला सरळ सरळ सांगितली. त्यांतील ॲनीचें 'गृहसुखदर्शन' हा भाग ऐकतांना मेरीयम्‌च्या जिवाचें पाणी पाणी झालें!

**९५१ ते १००० :**

**मात्र वदे ती......वचनीं तो रेंगाळला!** : या ओळींत, कसल्याहि परिस्थितींत वात्सल्य हें कसें थोर व परिणामकारी असतें हें टेनिसन्‌ने दाखविलें आहे. मनाचा निश्चय झाला, मृत्यूहि समोर दिसूं लागला, सर्व कांही ठरवलें, आता कांहीहि करावयाचें नाही हें योजलें; पण संवादाअंतीं जेव्हा मेरीयम् म्हणाली, 'अरे पण आपलीं बाळं तरी बघ डोळ्यांनी पुन्हा एकदा! जाऊन आणूं का मी त्यांना?' आणि ती उठलीहि! इनॉकला क्षणभर मुलांचा पुन्हा मोह पडला व तो तिच्या वचनावर क्षणभर रेंगाळला! कारण त्याच्या अंतःकरणांत पुन्हा कालवाकालव झाली! पण ही शेवटची कसोटी होती. तो मेरियम्‌ला म्हणाला,

**......'बाई, अंतीं आता,**
**नकोस मजला अस्वस्थ करूं लावुन असली ममता!'**

इथे इनॉकच्या मनाचा संपूर्ण संयम दिसतो व त्याचें मन निर्भय झालेलें दिसतें. आता तो एका दिव्य भावनेने प्रेरित झाला होता व त्याच विचारांत तो तरंगत होता.

**स्वाधिन करितों मनोगतं...करितां थोर मनाने !** : या चौदा ओळींत अगदीं थोडक्या शब्दांत इनॉकने आपल्या जीवनातलें सार, जीवनांतला एकमेव रस म्हणजेच आपलीं मनोगतें मेरीयमच्या स्वाधीन केलीं. त्यांत त्याने आपल्या ॲनीला मुलांबाळांना व फिलिपलाहि सांगण्यासाठी आशीर्वादात्मक निरोप निवेदन केले. ह्या निरोपांत पहिला निरोप आपल्या जिवाचें ' सर्वस्व ' अशी जी **ॲनी** तिला आहे व शेवटचा निरोप त्याचा वैवाहिक जीवनांतील प्रतिस्पर्धी जो **फिलिप** त्याला आहे; आणि मुलांना दिलेले निरोप मधे आहेत. ही योजना देखील अतिशय कलात्मक आहे. प्रथम ॲनीची स्मृति झाली म्हणून इनॉक जेवढा मोठा वाटतो, तितकाच तों शेवटीं फिलीपलाहि विसरला नाही म्हणून मोठा वाटतो; आणि मुलांना तर त्याने दोघांच्या मधेच ठेवले आहे. हे निरोप आशीर्वादात्मक असले तरी त्यांत इनॉकची सर्व संस्कृति, सर्व भावना, सगळ्या जीविताचें सार साठविलेलें आहे; त्यामुळे व शब्दांच्या मोजकेपणामुळे त्यांत विलक्षण भावनोत्कटता आली आहे. हे आशीर्वाद वाचून ज्याला रडूं येणार नाही, असा वाचक विरळा !

या प्रत्येक आशीर्वादांत त्या त्या व्यक्तीचें वैशिष्ट्य आहे. ॲनीसंबंधी म्हणतांना-' **चिर मी प्रीति करून !** ' हें त्याने म्हटलें; आपल्या मुलीला आशीर्वाद देतांना-' **शेवटला श्वास टाकिला तुज आशीर्वादून !** ' असें म्हटलें; मुलासंबंधी बोलतांना-' **तुला आशीर्वादून गेलों !** ' आणि फिलिपसंबंधी बोलतांना-' **तुलाहि** ' असे शब्द त्याने उच्चारले. या प्रत्येक शब्दांतील अर्थ त्या त्या भावनेचा द्योतक आहे. मुलीला आशीर्वाद देतांना-' **अन् मातेपरि हुबेहूब जी दिसली माझ्या नयना,** ' हा उल्लेख व फिलिपला आशीर्वाद देतानां ' **किति वानूं मी थोरी त्याची करितां थोर मनाने !** ' हा उल्लेख तो विसरत नाही. मनुष्याच्या सर्व संस्कृतीचें सार म्हणजे त्याची प्रेमबुद्धि व त्याची कृतज्ञताबुद्धि हेंच आहे;

मग या भावना थोरासंबंधी असोत वा लहानांसंबंधी असोत. त्यांचें जिथे वैपुल्य आढळतें, त्या ठिकाणीं संस्कृतीचा परमोत्कर्ष झाला असें समजावें. या दृष्टीने अशिक्षित इनॉक हा संस्कृतीच्या उच्च पदवीला आपल्या गुणांनी कसा पोंचला होता, तें ध्यानीं येईल.

**मुलास माझ्या......चिर कोमेजे !** : मनुष्याचें खरेंखुरें प्रेममय जीवन त्याच्या जीवनांतील 'कणाकणांत' व 'क्षणाक्षणांत' दिसलें पाहिजे, म्हणजेच तो पूर्णतेला गेला असें म्हणतां येतें. इनॉकचें तसें झालें होतें. मुलांना भेटण्याचा मोह त्याने आवरला; पण, 'आपण मेल्यावर मुलांना जर आपणांस भेटण्याची म्हणजे मृत शरीर पाहण्याची इच्छा झाली, तर त्यांना येऊं दे, पण तिने ( ॲनीने ) मात्र येतां कामा नये,' असा निरोप तो मेरीयम्‌ला सांगतो. प्रथमदर्शनी हें निष्ठुरपणाचें वाटतें, पण जेव्हा तो सांगतो कीं–' मुलांनी मला पूर्वी पाहिलें असलें तरी त्यांच्या मी लक्षांत नाही; पण ॲनीने मला नेहमीच पाहिले असल्यामुळे व माझा चेहरा तिला पूर्ण परिचित असल्याने, तिने माझे 'मृत मुख' पाहिलें की तिचें जीवन कायमचें कोमेजून जाईल, आणि तेंच मला व्हावयास नको आहे !' तेव्हा हा त्याचा आशय ऐकून त्याच्या ॲनीवरील अथांग, गाढ प्रेमाची आपल्याला साक्ष पटते. '**प्रीति दोनदा करतां येते ?**' या ॲनीच्या प्रश्नाच्या उत्तराची खरी सार्थकता येथें पटते व '**प्रेम लाभे प्रेमळाला त्याग ही त्याची कसोटी**' या वचनाचें प्रत्यंतर येतें. इनॉकच्या जीवनाचे 'कण आणि क्षण' ॲनीबद्दलच्या प्रीतीने कसे प्रीतिमय झाले होते, हें पाहिलें की आपणांसहि परमावधीचें समाधान होतें.

**कुटुंबियांतिल माझ्या...मी तोच म्हणून !** : या परिच्छेदांत इनॉकचे निरोप संपले, पण शेवटचें म्हणून कांही सांगतांना, टेनिसन्‌ने फार विलक्षण असा एक नाट्यमय प्रसंग घालून तो चितारला आहे. इनॉकचा मृत मुलगा, त्याची कुरळी बट व ती ॲनीला देतांना म्हणावयाचे खुणेचे शब्द ( **की 'मी तोच !'** ) ह्या सर्वच घटना हृदयस्पर्शी आहेत ! या कुरळ्या बटेच्या घटनेने जणु कांही आमूलाग्र कथानक टेनिसननें पुन्हा एकदा वाचकांच्या डोळ्यापुढून झरकन नेलें, कथानकाला पूर्णत्व आणलें

व तें तिथेच संपविलें ! कथानकाचा खरा शेवट इथेच आहे, पुढील भाग मामुली आहे.

**वदतांना तो इथे थांबला...यात्रा सर्व निमाली !** : हा पुढील भाग मामुली आहे, याचा अर्थ तो अनावश्यक आहे असें मात्र नव्हे. तो अत्यंत अन्वर्थक आहे, पण खरें कथानक वरच संपलें. हा या म्हणण्यांतील आशय आहे. या परिच्छेदांत इनॉकचें दुखणें, बंदरांतल्या समुद्राच्या लाटांचा प्रचंड ध्वनि, मेरियमूचें पेंगणें हे स्वाभाविक सर्व भाग आहेत, आणि शेवटीं इनॉकने उच्चारलेले

**......" शीड ! शीड ये आंत !—**
**सुटलों ! सुटलों ! "......**

हे शब्द त्याला निर्जन एकाकी बेटावर दिसलेल्या शिडांचे किंवा त्याच्या मोक्षाचें म्हणजेच त्याच्या अनन्य प्रीतीचें फळ त्याच्या पदरांत पडल्याचें सूचक असे आहेत. टेनिसन्ने आपल्या कल्पनाशक्तीने काव्यांतील वातावरण शेवटपर्यंत असें भरघोस रंगवीत नेलें, ही त्याची करामत प्रशंसनीय आहे.

**१००० ते १००४ :**

**अशापरीने......वैभवशाली !** : इनॉकचें थडगें मोठें वैभवशाली झालें व तें तसें करण्यांत ॲनी, फिलीप, मुलें व गांवकरी या सर्वांनीं भाग घेतला होता, ही कल्पना ' यात्रा ' या शब्दांने टेनिसनने सुचविली आहे. ज्या गांवांत तो वाढला, जिथे त्याने ॲनीवर प्रेम केलें, जिथे त्याने आयुष्यांतील सुखाचीं सात वर्षें घालविलीं व जिथे ॲनीवर गांवच्या कुटाळकंपूनी भलभलते आरोप केले, तिथले सर्व लोक एकदिलाने त्याच्या स्मशानयात्रेसाठी जमले व त्यांनी त्याचे '**वैभवशाली थडगें बांधलें**' हें सांगण्यांत टेनिसन्ने सर्वांनाच योग्य न्याय दिला आहे. कथानकाच्या निर्दोषपणाचें हें आणखी एक गमक आहे.

आणि काव्य वाचून आपण तें हातावेगळें केलें, तरी त्यांतील शोकांतिक चित्र आपल्या डोळ्यापुढून कित्येक दिवस हलत नाही, ही या काव्याच्या संपूर्ण यशस्वितेची खूण आहे !

● ● ●

# परिशिष्ट

## मराठींतील भाषांतरित व रूपांतरित खंडकाव्यांची परंपरा

| काव्याचें नांव | सन | लेखकाचें नांव | मूळ |
|---|---|---|---|
| मेघदूत | १८६५ | कृष्णशास्त्री चिपळूणकर | संस्कृत-मेघदूत |
| गिल्पिन चरित्र | १८६७ | ब. बा. लेले | इंग्रजी-कौपर-डायव्हर्टिंग हिस्टरी ऑफ् जॉन गिल्पिन |
| दैवसेनी | १८६७ | डॉ. का. र. कीर्तिकर | इंग्रजी-लेडी ऑफ दी लेक |
| ऋतुवर्णन | १८७१ | कृष्णशास्त्री राजवाडे | संस्कृत-ऋतुसंहार |
| अजविलाप | १८७२ | गो. वा. कानिटकर | संस्कृत-रघुवंश सर्ग ८ |
| नरनारायण चरित्र | १८७७ | के. त्र्यं. मांडवगणे | संस्कृत-महाभारत-उपाख्यान |
| भट्टवंश | १८७७ | ग. न. पटवर्धन | संस्कृत-गणेशपुराण |
| मेघदूत | १८७८ | बा. गो. इस्लामपूरकर | संस्कृत-मेघदूत |
| अमरुशतक | १८८१ | गणेशशास्त्री लेले | संस्कृत-अमरुशतक |
| श्रीपाल चरित्र | १८८३ | आ. आ. वाडकर | मागधी |
| करुणविलास | १८८३ | ए. ग. भांडारे | संस्कृत-भामिनीविलास |

| | | | |
|---|---|---|---|
| इंदिरा | १८८४ | डॉ. का. र. कीर्तिकर | इंग्रजी–टेनिसन्-प्रिन्सेस् |
| शृंगारतिलकादर्श | १८८४ | कृ. ना. आठल्ये | संस्कृत–शृंगारतिलक |
| अभिनव कादंबरी | १८८६ | गं. रा. मोगरे | संस्कृत–धुंडिराजकृत काव्य |
| माझा ओसाड पडलेला गांव | १८८६ | ना. वा. टिळक | इंग्रजी–गोल्डस्मिथ-डेझर्टेड व्हिलेज |
| श्रीशिवकाव्य | १८८७ | वा. भा. भावे | संस्कृत–शिवकाव्य |
| षड्ऋतुवर्णन | १८८७ | पांडुरंगशास्त्री पारखी | संस्कृत–ऋतुसंहार |
| गीतगोविंद | १८८८ | चेतोहर देव | संस्कृत–गीतगोविंद |
| संगीत शिवलीलामृत | १८९५ | बा. आ. पटवर्धन | मराठी–श्रीधरकृत काव्य |
| मेघदूत | १९०१ | ल. ग. लेले | संस्कृत–मेघदूत |
| यक्षसंदेश | १९०२ | भा. शं. देवस्थळी | संस्कृत–मेघदूत |
| शमसोनमल्ल नाटक | १९०३ | ग. र. नवलकर | इंग्रजी–मिल्टन्‌चें सॅम्सन ॲगोनिस्टिस |
| **सदू कोळी** | १९०३ | ग. र. नवलकर | इंग्रजी–टेनिसन्‌चें इनॉक ऑर्डन् |
| यक्षप्रसाद | १९०४ | किरात | संस्कृत–मेघदूत |
| सुवर्ण दुर्गांतील बंदिवान् | १९०४–०५ | दा. रा. बापट | इंग्रजी–बायरन्‌चें प्रिझनर ऑफ शिलान् |
| मेघदूतछाया | १९०५ | अंतरकर | संस्कृत–मेघदूत |

| | | | |
|---|---|---|---|
| मेघाचें अलकेस प्रयाण | १९०६ | गं. गो. दामले | संस्कृत–मेघदूत |
| मेघनादवध | १९०६–०८ | माधवानुज | बंगाली–मा. म. दत्ताचें काव्य |
| बुद्धजन्य | १९०८ | गं. रा. मोगरे | इंग्रजी–लाइट ऑफ एशीया ( अपूर्ण ) |
| काय हो चमत्कार ! | १९११ | चंद्रशेखर | इंग्रजी–सफोक मिरॅकल् |
| गीतांजलि | १९१३–१५ | माधवानुज | बंगाली–गीतांजलि |
| विरहिणी राधा | १९१६ | ए. पां. रेंदाळकर | बंगाली–मा. म. दत्ताचें काव्य |
| प्रवासी | १९१६ | ना. म. भिडे | इंग्रजी–गोल्डस्मिथचें ट्रॅव्हलर |
| सारजा | १९१७ | ए. पां. रेंदाळकर | इंग्रजी–टेनिसनचें इनॉक ऑर्डन् |
| श्रीरामचरित्रमानस | १९२० | ग. स. भोपटकर | हिंदी–तुळशीदासाचें काव्य |
| बालक | १९२० | वा. ज. कुंटे | बंगाली–टांगोर |
| गीतगोविंद | १९२३ | वसंतविहार | संस्कृत–गीतगोविंद |
| शियांगचा बंदीवान् | १९२३ | वि. ह. देशपांडे | इंग्रजी–बायरनचें प्रिझनर ऑफ शिलान् |
| रंगराव हर्षे चितोपंत उदास | १९२३ | चंद्रशेखर | इंग्रजी–मिल्टन्चें ललेग्रो व इल्स्पेन्सेरेझो |
| महाराष्ट्र गीतांजलि | १९२५ | श्री. ना. शारंगपाणी | बंगाली–गीतांजलि |
| मातृहृदय | १९२७ | दे. ल. महाजन | इंग्रजी–मदर्स लव्ह |

| | | | |
|---|---|---|---|
| गीतगोविंद | १९२८ | अनंततनय | संस्कृत–गीतगोविंद |
| शिवप्रताप | १९२८ | दु. आ. तिवारी | हिंदी–शिवाबावनी |
| अभंग गीतांजलि | १९२८ | ऋग्वेदी–वा. मं. दुभाषी | बंगाली–गीतांजलि |
| उ. ख. रुबाया | १९२९ | मा. त्रिं. पटवर्धन | पर्शियन–रुबाया |
| महाराष्ट्र गीतांजलि | १९३१ | दे. ल. महाजन | बंगाली–गीतांजलि |
| शिवराजभूषण | १९३१ | दु. आ. तिवारी | हिंदी - शिवराजभूषण |
| द्राक्षकन्या | १९३१ | मा. त्रिं. पटवर्धन | इंग्रजी–फिट्झेरल्ड रुबाया |
| निर्जनग्राम | १९३३ | ग. रा. हवालदार | इंग्रजी–गोल्डस्मिथ्चें डेझर्टेड् व्हिलेज |
| जीवनाधार | १९३४ | गो. न. नातू ( मनमोहन ) | इंग्रजी–टेनिसन्चें इनॉक ऑर्डन् |
| सुश्लोक गोविंद | १९३४ | डॉ. रा. चिं. श्रीखंडे | संस्कृत–गीतगोविंद |
| महाराष्ट्र मेघदूत | १९३८ | शां. आ. सबनीस | संस्कृत–मेघदूत |
| सौंदर्यलहरी | १९३९ | रा. मा. भांबुरकर | संस्कृत–सौंदर्यलहरी |
| रवींद्रनाथांचा शिशु | १९४३ | म. का. कारखानीस | बंगाली–शिशु |
| मेघदूत ( समश्लोकी ) | १९४४ | चिं. द्वा. देशमुख | संस्कृत–मेघदूत |
| विसर्जन ( मुक्तछंद ) | १९४४ | अ. सी. केळूसकर | बंगाली–विसर्जन |

| | | | |
|---|---|---|---|
| मेघदूत ( समश्लोकी ) | १९५० | ग. रा. हवालदार | संस्कृत–मेयदूत |
| मेघदूत | १९५२ | वि. वा. शिरवाडकर | संस्कृत–मेघदूत |
| स्मशानविलाप | १९५४ | ग. रा. हवालदार | इंग्रजी–ग्रे एलेजी |

——

# गिरीश यांचीं पुस्तकें

## काव्य

| | | |
|---|---|---|
| १ | अभागी कमल | वैधव्यजीवनावरील खंडकाव्य |
| २ | कला | कलाजीवनावरील खंडकाव्य |
| ३ | आंबराई | शेतकी जीवनावरील खंडकाव्य |
| ४ | कांचनगंगा | १९१३ ते १९३०–स्फुट कविता |
| ५ | फलभार | १९३० ते १९३४–स्फुट कविता |
| ६ | मानसमेघ | १९३४ ते १९४३–स्फुट कविता |
| ७ | चंद्रलेखा | १९४२ ते १९५१–स्फुट कविता |
| ८ | अनिकेत | टेनिसन्च्या इनॉक ऑर्डनचें भाषांतर |

## गद्य

| | | |
|---|---|---|
| ९ | काव्यकला | टीकात्मक लेखसंग्रह |
| १० | मराठी नाट्यछटा | नाट्यछटेवरील विवेचनात्मक प्रबंध |

## आगामी

| | | |
|---|---|---|
| ११ | कांचनमेघ | कांचनगंगा, फलभार व मानसमेघ यांमधील निवडक स्फुट कविता |

## मिळण्याचे पत्ते

**१. व्हीनस बुक स्टॉल**

अप्पा बळवंत चौक, बुधवार, पुणें २

**२. प्रा. शंकर केशव कानेटकर**

**‘ कांचन ’ विश्रामबाग**

पो. विलिंग्डन कॉलेज ( सांगली )

जि. दक्षिण सातारा

# रविकिरणमंडळाचीं पुस्तकें

१ **किरण**—गद्यपद्य, मंडळ
२ **काव्यविचार**—गद्य, मंडळ
३ **उषा**—पद्य, मंडळ
४ **मधुमाधव**-घाटे-मा. जूलियन्
५ **शलाका**-गद्यपद्य, मंडळ
६ **विरहतरंग**—माधव जूलियन्
७ **कला**—गिरीश
८ **नाट्यरूप महाराष्ट्र**—
श्री. विठ्ठलराव घाटे
९ **छन्दोरचना**—वृत्तशास्त्र—
डॉ. मा. त्रिं. पटवर्धन
१० **प्रभा**—पद्य, मंडळ
११ **सुधारक**—माधव जूलियन्
१२ **आंबराई**—गिरीश
१३ **यशोधन**—यशवंत
१४ **उमर खय्यामच्या रुबाया**—
डॉ. मा. त्रिं. पटवर्धन
१५ **भावमंथन**—यशवंत
१६ **कांचनगंगा**—गिरीश
१७ **द्राक्षकन्या**—मा. जूलियन्
१८ **बंदीशाळा**—यशवंत
१९ **गज्जलांजलि**—मा. जूलियन्
२० **जयमंगला**—यशवंत
२१ **फलभार**—गिरीश
२२ **अभागी कमल**—गिरीश
२३ **स्वप्नरंजन**—मा. जूलियन्
२४ **यशोगंध**—यशवंत
२५ **काव्यकला**—टीकालेख—
प्रा. शं. के. कानेटकर
२६ **मराठी नाट्यछटा**—प्रबंध—
प्रा. शं. के. कानेटकर
२७ **तुटलेले दुवे**—मा. जूलियन्
२८ **भाषाशुद्धिविवेक**—
डॉ. मा. त्रिं. पटवर्धन
२९ **कांहीं म्हातारे**—श्री. विठ्ठलराव घाटे
३० **श्रीमनोरमा**—
श्रीधर-मनोरमा रानडे
३१ **नकुलालंकार**—मा. जूलियन्
३२ **मधुलहरी**—मा. जूलियन्
३३ **यशोनिधि**—यशवंत
३४ **मानसमेघ**—गिरीश
३५ **यशोगिरी**—यशवंत
३६ **कांतणीचें घर**—लघुनिबंध—
श्री. य. दि. पेंढारकर
३७ **ओजस्विनी**—यशवंत
३८ **चंद्रलेखा**—गिरीश
३९ **पाणपोई**—यशवंत
४० **स्वप्नलहरी**—मा. जूलियन—
संपादक : गिरीश
४१ **अनिकेत**—गिरीश

**रविकिरण मंडळ, 'सुषमा', पुणें ४**

मूल्य सव्वा दोन रुपये

आगामी प्रकाशनें

१ ब्राह्मण कन्या
—डॉ. श्री. व्यं. केतकर

२ नाट्यकला प्रवेश
—प्रा. अ. म. जोशी

३ डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्या
—डॉ. द. न. गोखले

व्हीनस प्रकाशन
४१० शनवार पेठ : पुणें २